


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

संपादक-मंडळ

य. दि. पेंढरकर
श्री. के. क्षीरसागर
वा. ल. कुलकर्णी
अरविंद मंगरूळकर

वर्ष २९, अंक ११६ | जानेवारी–फेब्रुवारी-मार्च १९५६

या अंकांत



संपादकीय पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी,
मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष २९, अंक ११६ जानेवारी–फेब्रुवारी-मार्च १९५६

# संपादकीय

## कृ. पां. कुलकर्णी यांचीं व्याख्यानें

या वर्षाचीं मुंबई विद्यापीठाचीं "विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्यानें" देण्याचा बहुमान मराठीचे नामवन्त प्राध्यापक व कोशकार प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांना मिळाला याबद्दल मी त्यांचें अन्तःकरणपूर्वक अभिनन्दन करतों. हीं व्याख्यानें मार्चच्या पहिल्या आठवड्यांत झालीं. या व्याख्यानमालेंत आतापर्यंत अनेक प्राच्यविद्यापंडितांनी आणि भाषाशास्त्रज्ञांनी आपलीं विद्वत्ताप्रचुर अशीं व्याख्यानें गुंफलेलीं आहेत. महाराष्ट्रांतील डॉ. रामकृष्णपंत भांडारकर, राजारामशास्त्री भागवत, डॉ. गुणे, प्राचार्य वासुदेव बळवन्त पटवर्धन, कादंबरीकार हरिभाऊ आपटे, डॉ. कत्रे इत्यादि विद्वानांचीं नांवें या मालेंतील व्याख्यात्यांत आढळून येतात. प्राचार्य वासुदेवराव पटवर्धन आणि हरिभाऊ आपटे यांचीं वाङ्मयीन विषयावरील व्याख्यानें सोडलीं तर इतरांचीं व्याख्यानें हीं अर्थात् भाषाशास्त्रावरील होतीं. यंदाच्या व्याख्यानांचे मानकरी प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनीहि आपल्या व्याख्यानांचा विषय भाषाशास्त्रीयच निवडावा हें साहजिकच होय. भाषाशास्त्रांत ते पारंगत असून त्या विषयाचें ज्ञान भाषाशास्त्राच्या विद्यार्थ्यांना करून देण्यासाठी त्यांनी अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. त्याचप्रमाणे ते कै. वि. का. राजवाडे यांना गुरु मानतात हेंहि या संदर्भात लक्षांत घेण्यासारखें आहे.

प्रा. कुलकर्णी यांच्या व्याख्यानांचा विषय "आधुनिक आर्यभारतीय भाषांचे, प्राचीन व मध्यकालांतील भाषांपासून व्युत्पादितां येणारे विशेष" (Linguistic peculiarities of Modern Indo Aryan Languages as derived from the Old and

Mid Indo-Aryan ) असा होता. विषयाचें विवेचन त्यांनी एकूण सहा व्याख्यानांत केलें. त्या सहा व्याख्यानांचे पोट–विषय पुढीलप्रमाणे होते. ( १ ) प्राक् वैदिक आणि हिटाइट भाषा, ( २ ) इंडो–इराणी भाषांचा गट, ( ३ ) वैदिक, अवेस्ता आणि संस्कृत भाषा, ( ४ ) पाली आणि प्राकृत भाषा, ( ५ ) आधुनिक आर्यभारतीय भाषांचा उगम आणि विकास आणि ( ६ ) मराठी आणि तिच्या भाषा-भगिनी.

या व्याख्यानांची सुरवात प्रा. हरि दामोदर वेलणकर यांच्या अध्यक्षतेखाली झाली. मात्र या व्याख्यानांचा समारोप करावयाला अध्यक्ष उपस्थित नव्हते ! श्रोतृवृन्दाच्या स्वाधीन एकदा व्याख्यात्यांना केलें म्हणजे विद्यापीठांच्या चालकांची जबाबदारी संपते असें नव्हे. हीं भाषाशास्त्रीय व्याख्यानें म्हणजे एक बौद्धिक समारंभ होय, आणि समारंभाचे प्रचलित सर्व संकेत पाळणें हें विद्यापीठाच्या चालकांचें कर्तव्य आहे याची जाणीव त्यांना जातां जातां करून देणें इष्ट वाटतें.

प्रस्तुत व्याख्यान विषयाचा व्यापच एवढा मोठा आहे की, त्यांत थोडाफार पसरटपणा शिरला तर आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. सर्व आधुनिक आर्यभारतीय भाषांचे तौलनिक विशेष आणि पुन्हा त्यांचा थेट वैदिक हिटाइटपर्यन्तचा मागोवा इतक्या साऱ्यांचा विचार फक्त सहा व्याख्यानांत करणें ही गोष्ट अत्यन्त कठीण होती. त्यामुळे तसें करतांना कांही ठळक गोष्टींचेच उल्लेख येणें किंवा संकलनाचाहि भास होणें अगदी अपरिहार्य होतें. मात्र पहिल्या व्याख्यानांतील हिटाइट भाषेचा विचार या व्याख्यानमालेतील विशेष मानावा लागेल. त्या भाषेच्या अल्प परिचयामुळेहि तसें वाटणें शक्य आहे. भाषाशास्त्र हा विषयच असा आहे की, विद्वानांत त्यासंबंधी विविध मतभेद असणें हें स्वाभाविक होय. त्यामुळे, प्रा. कुलकर्णी यांच्या कांही मतांशीं इतर कांही भाषाशास्त्रज्ञांचीं मतें जुळतीलच असें नाही. उदाहरणार्थ, मराठी भाषा ही महाराष्ट्री आणि अपभ्रंश या भाषांपासून निर्माण झाली आहे हें त्यांचें मत कांही भाषाशास्त्रज्ञांना अमान्य असूं शकेल; परंतु असे मतभेदाचे मुद्दे सोडले आणि प्रा. कुलकर्णी यांनीच आपल्या पूर्वीच्या ग्रंथांत प्रस्तुत विषयाच्या कांही भागांचें केलेलें विवेचन वगळलें तर आधुनिक आर्यभारतीय भाषा ( आणि विशेषतः मराठी ) यांचीं मुळें थेट प्राक्-वैदिक काळापर्यन्त कशीं पोहोचतात हें त्यांनी आपल्या या व्याख्यानांत विस्ताराने नि ठामपणाने मांडून आपल्या गाढ व्यासंगाचें नि खोल संशोधनाचें प्रत्यन्तर आणून दिलें आहे.

प्रा. कृ. पां. उर्फ नानासाहेब कुलकर्णी हे महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे भूतपूर्व अध्यक्ष आहेत. परिषदेने नेमलेल्या शुद्धलेखन-समितीचे ते अध्यक्ष होते इ. स. १९५० सालीं कवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई येथे भरलेल्या साहित्य संमेलनांतील भाषा–व्याकरण या शाखा–संमेलनाचेहि ते अध्यक्ष होते. आतापर्यंत ‘ मराठी भाषा : उद्गम आणि विकास ’, ‘ शब्दः उद्गम आणि विकास ’, राजवाडे व्युत्पत्तिकोशाची प्रस्तावना आणि त्यांचा स्वतःचा व्युत्पत्तिकोश इत्यादि ग्रंथ त्यांनी लिहिले आहेत. या ग्रंथांच्या मालिकेंत प्रस्तुत व्याख्यानांचाहि समावेश होईल याबद्दल शंका नाही. म. सा. परिषदेने योजिलेल्या ‘ मराठी वाङ्मयाच्या इतिहासां’तील शेवटचा भाषेचा खंड प्रा. कुलकर्णी यांच्याच संपादकत्वाखाली तयार होणार आहे. कोणत्याहि प्रकारचा गाजावाजा न करतां व्याकरण, भाषाशास्त्र, इतिहास वगैरे विषयांचा व्यासंग करणारी जी थोडी विद्वान् मंडळी महाराष्ट्रांत आहेत त्यांत प्रा. कुलकर्णी यांचें स्थान वरचें आहे. लेखनाप्रमाणेच तळमळीने बोलणारे जे वक्ते महाराष्ट्रांत आहेत त्यांतहि त्यांची गणना होते. व्याकरणासारख्या विषयावरहि ते वक्तृत्वपूर्ण बोलूं शकतात हें विशेष होय.

भाषाशास्त्र हा विषय अगाध आहे. मराठी भाषा आणि व्याकरण यासंबंधीचे अनेक कूट प्रश्न अजून अनुत्तरित आहेत. त्याचप्रमाणे मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाचे सर्व दुवे जुळवून मराठीचें संपूर्ण ऐतिहासिक व्याकरणहि तयार होणें जरुरीचें आहे. सर्व महाराष्ट्रभर ठिकठिकाणीं विखुरलेल्या अनेक प्रांतिक बोलींचाहि अजून साक्षेपाने व शुद्ध भाषाशास्त्रीय दृष्टीने विचार करावयाचा आहे. या कामासाठी प्रांतिक अगर केंद्रीय सरकारने प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्यासारख्या व्यासंगी विद्वानांचा उपयोग करून घेतला पाहिजे. पुरेसें द्रव्यबळ सरकारी योजनेने मिळूं शकल्यास, या वयांतहि नानासाहेबांचें नेतृत्व धडाडीचें होऊं शकेल असें मला वाटतें. प्रा. कुलकर्णी यांना मी सुयश चिंतितों.

## वाङ्मयाची अभिवृद्धि आणि सरकारी मदत

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यापासून अगर अधिक स्पष्ट लिहावयाचें म्हणजे आपल्याच लोकांच्या हातांत भारताच्या राजव्यवस्थेचीं सूत्रें आल्यापासून, प्रादेशिक भाषांच्या विकासासाठी व त्या त्या भाषांतील कलावंतांच्या कलेला उत्तेजन देण्यासाठी नभोवाणी व साहित्य-अकादमी यांच्या माध्यमाने केंद्रीय सरकार व उत्कृष्ट ग्रंथांना रोख बक्षिसें देऊन प्रांतिक सरकारें अनेक प्रकारें प्रयत्न करीत आहेत त्याबद्दल त्या त्या सरकारांचें अभिनंदनच करायला हवें. मात्र विशिष्ट योजनेच्या अभावामुळे अगर योजकांच्या संकुचित, अदूरदर्शी अगर अज्ञानमूलक धोरणामुळे किंबहुना प्रसंगीं वाङ्मयबाह्य मूल्यांच्या निकषांमुळे संकल्प आणि सिद्धि यांमधील अंतर कमी होऊं शकत नाही असाच अनुभव येतो. गेल्या फेब्रुवारी-मार्चमध्ये नभोवाणीवर मराठी कादंबरीकारांचा परिसंवाद व मराठी कवींचें काव्यगायन यांचे जे कार्यक्रम झाले त्यांचा जरा सूक्ष्मपणाने विचार केला म्हणजे माझ्या म्हणण्याचा रोख लक्षांत येऊं शकेल. या कार्यक्रमासाठी नभोवाणीमार्फत सरकारने हजारो रुपये खर्च केले; आणि कादंबरीकार व कवि यांच्या खिशांत कांही पैसे गेले ही एक आनंदाची नि स्तुत्य अशी घटना या कार्यक्रमांत घडली असली तरी लाखो श्रोत्यांचें या कार्यक्रमांनी समाधान कितपत झालें व त्यांच्या पदरांत वाङ्मयानन्दाचें माप कितपत पडलें असेल याबद्दल मी साशंक आहे. आठ-दहा कादंबरी-कारांचीं वक्तव्यें एका तासाच्या मुदतींत कोंबल्यामुळे, वाघ पाठीला लागल्याप्रमाणे त्यांनी त्या वक्तव्यांचें वाचन करावें हें त्यांच्या दृष्टीने साहजिक होतें. पण परिसंवादाची जी कल्पना आहे ती अशा वाचनाने पुरी होते काय ? यापेक्षा दोन गटांत हा कार्यक्रम विभागून दोन वेळां करण्यांत आला असता तर तें ठीक झालें असतें. पण त्याची योजना ही प्रथमपासून करायला हवी असते. कार्यक्रमासाठी राखून ठेवलेला पैसा मार्चमध्ये कसा खर्च करावयाचा किंबहुना कोणीकडून व कसातरी खर्च करावयाचा ही काळजी सरकारी अधिकाऱ्यांना असते. कारण तो सर्व खर्च झाला नाही तर कां झाला नाही व योग्य मुदतींत तो परत (surrender) कां केला नाही या दुहेरी शिस्तभंगाची तलवार त्यांच्या शिरावर टांगलेली असते. सरकारची ही शिस्त योग्यच असते. काव्यगायनाच्या कार्यक्रमाचीहि हीच दैना झाली. त्याच त्या कवींना पुन्हा पुन्हा पाचारून वेंधळेपणाने निवडलेल्या कवितांचें धावतें वाचन अगर गायन करण्याने आजच्या मराठी काव्याचें स्वरूप अगर त्यांतील प्रवाह नभोवाणीच्या श्रोत्यांना कळत असतील अशी जर योजकांची समजूत असेल तर ती बरोबर नाही. कादंबरीकारांच्या परिसंवादाच्या वेळीं प्रा. मं. वि. राजाध्यक्ष यांनी केलेलें सूत्रचालन मार्मिक होतें. पण तें करायला त्यांनाहि पुरेसा वेळ नसल्यामुळे त्यांना तें घाईघाईनेच आटपावें लागलें. अशाच प्रकारचें सूत्रचालन

कवींचें काव्य व त्यांची कविता यांना लाभलें तर श्रोत्यांच्या दृष्टीने असल्या कार्यक्रमांचें चीज होऊं शकेल व मराठी वाङ्मयाचा प्रसार व विकास करण्याचें जें धोरण असतें तें पार पाडण्याची शक्यता निर्माण होईल. नभोवाणीच्या अधिकाऱ्यांना 'कार्यक्रम झाले' यांतच समाधान असतें. पण ते कसे झाले याचा विचार जागरूक श्रोते करूं शकतात. वास्तविक या असल्या कार्यक्रमांची स्थूलमानाने योजना आखण्यासाठी सरकारने प्रादेशिक सल्लागार-मंडळें नेमिलेलीं आहेत. त्यांचा उपयोग कितपत केला जातो याची मला कल्पना नाही. पण तो अधिक डोळसपणाने नि व्यापकतेने व्हावा अशी अपेक्षा करावयास हरकत नाही. साहित्य-अकादमीचें कार्यहि जितक्या जोमाने चालेल असें वाटलें होतें तितकें तें होत नाही. याला सरकारच्याहि कांही अडचणी असूं शकतील. पण साहित्य-अकादमीवर सभासदांच्या नेमणुका करण्याच्या पद्धतीपेक्षा, सभासद निवडून देण्याची प्रथा सुरू झाल्यासच अकादमीच्या कार्यांत चैतन्य आणि योजनाबद्धता अधिक प्रभावीपणाने येऊं शकेल. हें झालें केन्द्रीय सरकारच्या प्रयत्नांबद्दल.

आता प्रांतिक सरकारांचा विचार करतां मध्यप्रदेश व मुंबई सरकार यांनी प्रादेशिक भाषांच्या विकासासाठी जे प्रयत्न चालविले आहेत ते या दोन्हीहि सरकारांना भूषणावह असेच आहेत यांत संदेह नाही. मराठी भाषा व वाङ्मय यांच्यापुरता विचार केला तर विदर्भ-साहित्य संघाच्या कार्याला जशी मध्यप्रदेश सरकारने भरघोस मदत केली आहे, त्याचप्रमाणे अनेक उत्कृष्ट मराठी पुस्तकांना रोख बक्षिसेंहि दिलीं आहेत. मुंबई सरकारनेहि मराठींतील उत्कृष्ट पुस्तकांना गेल्या वर्षापासून बक्षिसें देण्याची स्तुत्य प्रथा अमलांत आणली आहे. या वर्षी इ. स. १९५० ते १९५३ या कालखंडांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची मागणी बक्षिसांच्या स्पर्धेसाठी प्रकाशक-लेखकांकडून करण्यांत आली होती. ज्या प्रकाशकांनी व लेखकांनी या स्पर्धेत भाग घेऊन आपापलीं प्रकाशनें पाठविलीं त्यांतील उत्कृष्ट पुस्तकें निवडून त्या त्या ग्रंथकारांना रोख रकमांचीं बक्षिसें देण्यांत आलीं. अशा सरकारी स्पर्धेत नेहमीच उत्कृष्ट ग्रंथांना बक्षिसें मिळतात अगर मिळतील असें नाही, आणि त्याबद्दल सरकारला दोष देण्यांत स्वारस्य नाही. कारण पुस्तकांची निवड करण्यासाठी जी समिति नेमण्यांत येते तिच्याकडून नेहमीच वाङ्मयमूल्यांचे निकष निवडीला लावण्यांत येतात असा अनुभव नाही. वाङ्मयबाह्य मूल्यांचे निकषहि लावले जातात, व शेवटीं कमी-अधिक प्रमाणांत योग्य-अयोग्य अशी निवड केली जाते. पुष्कळ वेळां ही निवड सावकाशीने करण्याइतकी सवड समितीला देण्यांत येत नाही व मार्चअखेर कांहीहि करून निर्णय जाहीर करण्याची जबाबदारी मात्र तिच्यावर पडते. त्यामुळे समितीच्या सर्वच सभासदांना एवढीं सर्व पुस्तकें काळजीपूर्वक वाचण्याइतकी सवड नेहमी मिळेलच असें नाही. त्यामुळे बक्षिसांसंबंधीचे निर्णय पुष्कळ अंशीं चुकीचे असण्याचा धोका संभवतो व तो धोका पत्करावा लागतो. पण बक्षिसांच्या या स्पर्धेत जे ग्रंथकार भाग घेऊं इच्छित नाहीत किंबहुना स्पर्धेत अशा रीतीने भाग घेणें ज्यांच्या प्रकृतीला व प्रतिष्ठेलाहि मानवत नाही त्यांचीं कांही पुस्तकें हीं उत्कृष्ट असूनहि स्पर्धेच्या बाहेर राहतात व त्यांच्या गुणांचें चीज होऊं शकत नाही. यासाठी सरकारला अशी सूचना करावीशी वाटते की, स्पर्धेसाठी पुस्तकें न मागवितां पुस्तकांचे विषयानुक्रमाने निरनिराळे गट करून ते जाहीर करावे व त्या त्या गटांतील पुस्तकांच्या निवडीसाठी वर्षाच्या सुरवातीलाच परीक्षकांची समिति नेमून त्यांच्याकडून वर्षअखेर निर्णय मागवावे. हे परीक्षक त्या त्या गटांतील पुस्तकांचे तज्ज्ञ मात्र असावेत. असें झालें तरच शास्त्रीय वाङ्मयाच्या तज्ज्ञाने ललित व बालवाङ्मय यांवरहि आपले निर्णायक (!) मत ठोकून देण्याचा अनवस्था प्रसंग टळूं शकेल व त्या त्या गटांतील

पुस्तकांच्या लेखकांना न्याय मिळण्याची शक्यता निर्माण होईल. त्याचप्रमाणे उत्कृष्ट पुस्तकांची निवड व्यापक क्षेत्रांतून होऊं शकेल. त्या दृष्टीनेच स्पर्धेसाठी पुस्तकें पाठविण्याचीं आजचीं लाजिरवाणीं बंधनें तातडतोब बंद झालीं पाहिजेत. असें झालें तरच उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीस उत्तेजन दिल्याचें श्रेय सरकारला मिळूं शकेल व सरकारी रकमेचा योग्य असा विनियोग होईल. परीक्षकांचीं पॅनेल्स निवडण्याचें काम सरकारनें महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या मध्यवर्ती साहित्य-संस्थेच्या सहकार्यानें केल्यास तें जसें प्रातिनिधिक होईल त्याचप्रमाणे योग्य परीक्षकांची निवड करण्यासहि त्यामुळे सरकारला मदतच होईल. वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी व निर्मितीसाठी उत्तरोत्तर केन्द्रीय व प्रांतिक सरकारांकडून वाढती मदत मिळत आहे ही आनन्दाची गोष्ट होय. उत्कृष्ट वाङ्मय-निर्मितीसाठी 'नॅशनल बुक ट्रस्ट' स्थापन करण्याची योजना केन्द्र-सरकारने नुकतीच जाहीर केली आहे. उत्कृष्ट वाङ्मयाच्या निर्मितीस उत्तेजन मिळावें व तें वाङ्मय संस्थांना, शिक्षणसंस्थांना, ग्रंथसंग्रहालयांना व सर्वसाधारण जनतेला स्वस्त किमतींत उपलब्ध व्हावें हा या योजनेचा हेतु आहे. या कार्यासाठी येत्या पंचवार्षिक योजनेंत ३० लाखांची तरतूद करण्यांत आली असून, याच धर्तीवर प्रादेशिक ट्रस्टहि स्थापन करण्यांत येणार आहेत. अर्थात् या सरकारी मदतीचा विनियोग योग्य रीतीने झाला तरच प्रादेशिक भाषांच्या विकासाला जागा आहे. या विकासाच्या योजनांत सरकारने त्या त्या भाषांतील प्रातिनिधिक साहित्यसंस्थांचें सहकार्य मागावें व मागितल्यास त्यांनी तें अवश्य द्यावें. कारण परस्परसह-कार्यानेच योजना व्यवस्थित आखल्या जातील व त्यांची प्रगति सुलभ होऊ शकेल.

## श्री. वरेरकरांच्या वाङ्मसेवेचा गौरव.

श्री. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांची राष्ट्रपतींनी राज्यसभेवर पुढील सहा वर्षांसाठी सभासद म्हणून नेमणूक करून त्यांच्या दीर्घकालीन वाङ्मय-तपस्येचा गौरव केला आहे. या गौरवाबद्दल मी श्री. मामांचें अन्तःकरणपूर्वक अभिनंदन करतों. श्री. वरेरकरांना हा मान जरी व्यक्तिशः त्यांनी केलेल्या वाङ्मयसेवेबद्दल मिळाला असला तरी त्यांच्या नेमणुकाने एकंदरींत मराठी ललित वाङ्मयाचाच बहुमान झाला आहे असें मी समजतों. मराठी साहित्यिकाला अभिमान वाटावा इतका हा मान स्पृहणीय आहे. वरेरकरांच्या दृष्टीने बोलावयाचें म्हणजे त्यांनी आजवर केलेल्या वाङ्मयसेवेची सारी पुण्याईच या मानाने फळाला आली आहे, म्हणूनच त्याचें विशेष महत्त्व होय.

ललित वाङ्मय लिहून उपजीविका करणारे जे थोडे चांगले ललित लेखक महाराष्ट्रांत आहेत त्यांत श्री. वरेरकरांचें स्थान पहिलेंच आहे. गेलीं तीन-चार तपें सतत ललित वाङ्मय-निर्मितीचें हें कार्य वरेरकर करीत आलेले असून या त्यांच्या कार्यात आजहि खंड पडलेला नाही हें विशेष होय. मामा पदवीधर नाहीत अगर विद्यापीठाची कोणतीच परीक्षा ते उत्तीर्ण झालेले नाहीत. त्यामुळे त्यांना सुरवातीला वाङ्मय-लेखन व प्रकाशनाच्या कार्यांत अतोनात कष्ट पडले व प्रसंगीं मानहानीहि सहन करावी लागली. घरच्या गरिबीमुळेहि त्यांना संसारांत हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. पण पदवी व पैसा पदरीं नसतांहि त्यांनी परिस्थितीशीं सतत तीन तपें मोठ्या चिकाटीने नि धैर्याने टक्कर दिली व आता शेवटीं परिस्थितीवर मात केली आहे. वरेरकरांची वाङ्मयसेवा एवढी भव्य व विविध आहे की नाटकें, कादंबऱ्या, बंगाली कादं-बऱ्यांचे अनुवाद, रंगभूमिविषयक लेख मिळून त्यांची शंभराच्यावर सहज पुस्तकें झालीं असतील. पदवीधर अगर विद्वान् नसूनहि त्यांना लाजवील एवढी त्यांची स्वनिर्मित ग्रंथसंपत्ति

आहे. नागपूर विद्यापीठानें त्यांना एम्. ए. परीक्षेचे परीक्षक नेमून त्यांच्या वाङ्मयसेवेचा एका परीनें गौरवच केला होता. ललित वाङ्मय लिहिणाऱ्या लेखकांकडे त्या वेळीं प्रतिष्ठित पदवीधर एक प्रकारच्या तुच्छतेने पाहत होते. म्हणूनच असल्या या लहानशा मानाचें कौतुकहि वाटत असे. मामा साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष झाले या घटनेलाहि जें महत्त्व आहे तें त्याचमुळे. आज स्वतंत्र भारतांत प्रादेशिक भाषांच्या विकासाकडे सरकारचें विशेष लक्ष जात असल्यामुळे, ललित वाङ्मय-लेखकांना मानाचें स्थान मिळूं पाहत आहे. या पूर्वीच्या काळांत नाटकें व व प्रणयकथा लिहिणारे यांचें वेडेपीर, याच संबोधनानें समाज स्वागत करीत असे. ही परिस्थिति पालटण्यासाठी व समाजांत व सरकारांत ललित लेखकाला मानाचें स्थान मिळावें म्हणून वरेरकरांनी आपल्या लेखणीनें आणि वाणीनें गेलीं कित्येक वर्षे सतत परिश्रम केले आहेत. लोकदरबारीं व राजदरबारीं या लेखकांना महत्त्वाची प्रतिष्ठा मिळण्याचा नवा मनु प्राप्त होत आहे. हें स्वतःच्या डोळ्यांनी पाहण्याचें व अनुभविण्याचें भाग्य मामांना लाभत आहे. यांतच मामांच्या परिश्रमांची इतिकर्तव्यता झाली आहे असें म्हटलें तर तें वस्तुस्थितीस सोडून होणार नाही. आपल्या चळवळीचें नि परिश्रमाचें फलित उपभोगण्याचें भाग्य किती लोकांना लाभतें! मामा त्या दृष्टीने भाग्यवानच म्हटले पाहिजेत. त्यांनी एके काळीं जें अनन्वित दुःख व ज्या सांसारिक व सामाजिक हाल-अपेष्टा मोठ्या निर्धारानें सहन केल्या तें त्यांचें बलिदान फुकट गेलें नाही असेंच म्हटलें पाहिजे. ग्रामोफोन व रेडिओ हीं प्रथम आपल्या देशांत आल्याबरोबर त्यांच्या माध्यमाचा उपयोग करून घेण्याची हांक महाराष्ट्रांतील ललित लेखकांना मामांनीच प्रथम दिली. प्रत्येक वाङ्मयीन व सांस्कृतिक चळवळीच्या आघाडीवर असण्याची त्यांची वृत्ति लक्षांत घेतली म्हणजे वाङ्मयाबद्दलच्या त्यांच्या आस्थेचें महत्त्व लक्षांत येऊं शकेल. राजकारणाचा वाङ्मयाशीं अगदी जवळचा संबंध असून सामाजिक व राजकीय प्रगति करण्याच्या कामीं ललित वाङ्मयाचा प्रभावीपणानें उपयोग होतो हें त्यांचें मत अगदी सुरवातीपासूनच आहे; किंबहुना त्याच हेतूने प्रेरित होऊन त्यांनी ललित वाङ्मय लिहिलें आहे. त्यामुळेच त्यांच्या वाङ्मयांत त्यांच्या मतांचा प्रचार हिरिरीनें केलेला आढळून येतो. या प्रचारवादी भूमिकेमुळे क्वचित्प्रसंगीं त्यांच्या कलेला गौणत्व आलेलें आहे हेंहि या संबंधांत विसरून चालणार नाही. पण त्याची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे.

राज्यसभेच्या माध्यमाचा उपयोग मामा हे महाराष्ट्रीय संस्कृति व मराठी भाषा व वाङ्मय यांच्या प्रतिष्ठेसाठी करतील याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाही. मराठी लेखकांच्या कष्टमय जीवनाचा परिचय स्वानुभवाने त्यांना आलेलाच आहे. ती परिस्थिति सुधारण्याच्या कामीं त्यांच्या हातून प्रत्यक्षपणानें कांही तरी व्हावें अशी त्यांच्याकडून अपेक्षा करणें चुकीचें होणार नाही. मामांना राज्यसभेवर जाण्याचा हा मान मिळाल्यामुळे, त्यांच्या जीवनाला एक-प्रकारची प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. ते सुरवातीला कित्येक वर्षे पोस्ट खात्यांत नोकरीला होते, त्यामुळे, आपणांला पदवी नसली तरी आपण Man of Letters आहोंत असें ते अजूनहि विनोदानें म्हणत असतात! वास्तविक मामांनी एवढी ग्रंथसंपत्ति निर्माण केलेली असून, मराठी भाषा व वाङ्मय यांच्या प्रतिष्ठेत भर घातलेली आहे ही परिस्थिति लक्षांत घेऊन आता तरी पुणें विद्यापीठानें त्यांना डॉक्टरेटची सन्मान्य पदवी द्यावी अशी माझी सूचना आहे. आपण विद्यापीठाचे पदवीधर नाहींत ही मामांना वाटणारी खंत कायमची घालविण्याचें श्रेय पुणें विद्यापीठानें घेतल्यास पुणें विद्यापीठ हें खरेंखुरें जनतेचें विद्यापीठ आहे हें नांव सार्थ होईल.

## कै. वा. सी. मर्ढेकर

मराठी कवितेच्या परंपरेला ज्यांनी आपल्या काव्य-लेखनाने एक नवी 'पायवाट' पाडली ते श्री. बाळ सीताराम मर्ढेकर ता. २० मार्च १९५६ रोजीं कालवश झाले! त्यांचें निधन जितकें अकालीं तितकेंच तें अनपेक्षित होतें. नुकतेच कोठे जीवनाच्या ऐन उमेदींत ते येत होते आणि लेखनाची त्यांची उभारीहि जोम धरीत होती. इतक्यांतच त्यांच्या जीवनाचा शेवट व्हावा ही घटना मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने दुर्दैवीच म्हटली पाहिजे.

मर्ढेकर हे एक प्रयोगशील कवि व लेखक होते. लोकप्रियतेच्या मापाने त्यांनी कधीच लिहिलें नाही. त्यामुळे सर्वसामान्य वाचक त्यांच्या काव्याशीं अगर त्यांच्या कादंबऱ्यांशीं फारसा समरस होऊं शकला नाही. अर्थात्, त्यांनीहि तशी अपेक्षा कधी केलेली नाही हा एक त्यांच्या अहंकाराचा भाग म्हणतां येईल. त्यांनी लिहिलें तें स्वतःला लिहावेंसे वाटलें म्हणून—आत्मप्रकटी-करणासाठीं. दुसऱ्यांना कांही सांगावयाचें आहे व त्यांना तें समजावें म्हणून अगर समजावून सांगावें म्हणून भाषेशीं, प्रतीकांशीं, प्रतिमांशीं, उपमा—उत्प्रेक्षांशीं अगर संकेतांशीं त्यांनी कधीच तडजोड केली नाही. त्यांना वाटलें तें व वाटलें तसें त्यांनी लिहिलें आहे. इतरांच्यापेक्षा निराळा, थोडाफार विक्षिप्त असा जीवनाकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोन होता. आपल्या सामाजिक जीवनाची वडी भिसकटलेली आहे, त्यांत अनर्थच फार भरलेला आहे, ढोंगाचे देव्हारे माजवण्यांत आलेले आहेत, साफल्यापेक्षा वैफल्यच अधिक आहे, सौन्दर्यापेक्षा भेसुरता, भीषणता, विषण्णताच जीवनांत सर्वत्र दिसून येते असा त्यांचा समज—नव्हे त्यांचें निश्चित मत बनून गेलेलें होतें. स्वतःच्या बुद्धीबद्दल, स्वतःच्या विचारांबद्दल व स्वतःच्या योग्यतेबद्दल त्यांचा विशेष असा एक समज झालेला होता. त्यामुळे आपल्या गुणांचें, हुशारीचें, विद्वत्तेचें चीज झालें नाही म्हणजे ते स्वयंकेंद्रित होत, आत्मनिरीक्षण करीत. जग चुकतें आहे व आपण बरोबर आहों असें त्यांना वाटे. ते भलतेच व्यक्तिवादी, स्वयंकेंद्रित होते. पण त्यांच्या स्वभावां-तील हे विशेष त्यांच्या काव्यांतील सामर्थ्याला कारणीभूत झालेले आहेत. त्यांचें व्यक्तिवादित्व काव्यविषयांच्या व शब्दांच्या निवडीपासून मनोगताचें आविष्करण करण्याच्या पद्धतीपर्यंत प्रभावी ठरलेलें दिसून येईल. स्वतः एक व्यक्तिवादी कवि असूनहि तांबे यांची कविता त्यांना निकृष्ट वाटे, हें मात्र आश्चर्य होय.

मर्ढेकरांनी आपल्या साहित्य-संसाराला 'शिशिरागम' या काव्यसंग्रहाने इ.स. १९३९ सालीं सुरवात केली. या संग्रहांतील कवितांवर रविकिरण-मंडळांतील प्रमुख कवींच्या काव्य-वैशिष्ट्यांचा परिणाम झालेला दिसून येतो. पण तो अल्पकाल टिकला व अल्प कवितांपुरताच मर्यादित दिसून येतो. त्यानंतर त्यांचे 'कांहीं कविता' (१९४७) व 'आणखी कांहीं कविता' (१९५१) हे दोन संग्रह प्रसिद्ध होऊन नव कवितेचे अध्वर्यु म्हणून त्यांच्या काव्याचा व पर्यायाने त्यांच्या नांवाचा बराच बोलबाला झाला. 'कांहीं कविता' हें पुस्तक, त्यांत अश्लील मजकूर आहे या समजुतीने, सरकारने जप्त केलें व मर्ढेकरांच्यावर व प्रकाशकांवर खटला भरला. दंड भरून प्रकाशक मोकळे झाले, पण मर्ढेकरांनी खटला लढविण्याचें धैर्य व सामर्थ्य दोन्हीहि प्रकट केलीं. यांतून ते पुढे निर्दोष सुटले; पण खटला न्यायप्रविष्ट असतांनाच आचार्य जावडेकरांच्या अध्यक्षतेखाली पुण्याला जे साहित्यसंमेलन झालें त्यांत मर्ढेकरांच्या अश्लील वाङ्मय-निर्मितीबद्दल त्यांचा निषेध करणारा ठराव यावयाचा होता. पण म. म. पोतदार, डॉ. भाजेराव व मी यांच्या दक्षतेमुळे व आचार्य भागवत व आचार्य जावडेकर यांच्या साहाय्यामुळे व

समजूतदार धोरणामुळे विषयनियामक समितींतच तो बारगळला ! हा ठराव संमत झाला असता तर कोर्टांत चालू असलेल्या खटल्यावर तर अनिष्ट परिणाम झालाच असता पण त्यांच्या नभोवाणीवरील नोकरीवरहि कदाचित् गदा आली असती ! याच प्रसंगीं डॉ. भालेराव यांच्या व्यापक नि उदार धोरणाची खरी कसोटी लागलेली मला दिसून आली. डॉ. भालेरावांचें मत मर्ढेकरांच्या काव्याबद्दल फारसें अनुकूल नव्हतें, किंबहुना तें प्रतिकूलच होतें हें मी मर्ढेकरांची ' जिथें मारते कांदेवाडी, टांग जराशी ठाकुरद्वारा ' ही कविता ' साहित्यां ' त छापलेली त्यांना आवडली नाही त्या वेळीं कळलें. असें असूनहि साहित्य-संमेलनांत लेखकाचा अगर कवीचा विशिष्ट प्रकारच्या वाङ्मय-निर्मितीबद्दल जाहीर निषेध होऊं नये याबद्दल ते कटाक्षाने जागरूक असत, हें थोडेंसें विषयान्तर करूनहि सांगावेंसें वाटतें.

वाङ्मयीन प्रश्नांचे दर्दी समीक्षक म्हणून Arts & Man या इ. स. १९३७ सालीं इंग्लंडांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या इंग्रजी पुस्तकाने मर्ढेकरांना मिळालेल्या कीर्तीत त्यांच्या ' वाङ्मयीन महात्मता ' ( १९४१ ) या पुस्तकाने व त्यांनी केलेल्या कांही पुस्तकांच्या परीक्षणांनी भर घातली. सौंदर्य व साहित्य यासंबंधीचें त्यांचें विवेचन तर्काधिष्ठित आहे. शिवाय तें मूलगामीहि असल्यामुळे, त्यांच्या सखोल विचारसरणीचें प्रत्यन्तर यासंबंधींच्या त्यांच्या विवेचनांत आढळून येतें. त्यांच्या या टीकालेखांनी व परीक्षणांनीं मराठींतील टीकावाङ्मयांत एक निराळीच दृष्टि निर्माण केली. शिल्पकला, चित्रकला, गायनकला इत्यादि विविध कलांचें विशेष ज्ञान साहित्य-समीक्षकाला असलें पाहिजे याची जाणीव टीकाकारांना होऊं लागली. त्यामुळे मराठींतील साहित्य-समीक्षणाला निराळें वळण लागण्यास मदतच झाली.

मर्ढेकरांनी ' रात्रीचा दिवस ' ( १९४२ ), ' तांबडी माती ' (१९४३) व ' पाणी ' (१९४८) या तीन कादंबऱ्या लिहिल्या आहेत. कादंबऱ्यांच्या नांवांवरूनच त्या प्रतीकात्मक आहेत हें स्पष्ट होतें. ज्या एका विशिष्ट पद्धतीने व भाषाशैलीने त्यांनी त्या लिहिल्या आहेत त्यामुळे त्यांचे वाचक अल्पच राहिले आहेत. पण मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत त्यांनी आपल्या आकृतिबंधाचा एक नवाच प्रवाह आणून सोडला आहे हें मान्यच करावें लागेल. मर्ढेकर हे एक प्रयोगशील कलावन्त होते याचा उल्लेख वर आलाच आहे. याचें प्रत्यन्तर त्यांच्या कविता, कादंबऱ्या, नभोनाट्य, संगीतक वगैरे वाङ्मय-प्रकारांत आढळून येतें. मात्र त्यांच्या काव्यांतच हे प्रयोग विशेष आकर्षक स्वरूपांत दिसून आले, म्हणूनच त्यांनी मराठी परंपरेला ' पायवाट ' पाडली असें हेतुपूर्वक विधान मीं सुरवातीला केलें आहे. या ' पायवाटे ' ने जाणारे आज जरी थोडे कवि आढळून आले व या 'पायवाटे'चा जरी पुढे राजमार्ग झाला नाही तरी ही पायवाट निदान यथाकाल कांही लोकांच्या अंगवळणीं पडेल अशी आशा वाटते. म्हणूनच मर्ढेकरांच्या काव्याचें मूल्यमापन आजच करण्याचा प्रयत्न करणें हें विचारीपणाचें लक्षण ठरणार नाही. भावनाविवश होऊन मर्ढेकरांची अन्यांशीं तुलना करणें अगर त्यांच्या काव्य-प्रतिभेने नवयुग निर्माण केलें अगर ' नवीन परंपरा ' सुरू केली, असें म्हणणें हें विचारवन्त म्हणविणारांनी कटाक्षाने टाळलें पाहिजे. ज्या चुका मराठी टीकाकारांनी केशवसुतांचे समकालीन व त्यानन्तरच्या कवींचें मूल्यमापन करतांना केल्या, त्या चुकांमुळेच केवळ त्या कवींचें पुनर्मूल्यन आज करण्याची पाळी आलेली आहे. तीच परिस्थिति मर्ढेकरांच्या काव्याच्या बाबतींतहि होऊं नये म्हणूनच ही सावधगिरीची सूचना देणें आवश्यक वाटतें. मर्ढेकर व त्यांचें काव्य हें आपल्याला अगदी जवळ आहे. आपल्या डोळ्यांसमोर लिहिलें गेलें आहे. सर्वसामान्य

वाचकांच्या राहोच पण अद्याप कांही जाणकार काव्यरसिकांच्याहि तें पचनीं पडावयाचें आहे! अशा परिस्थितींत त्यांच्या मूल्यमापनाची घाई करणें हें अयोग्य होईल. खुद मर्ढेकरांनाहि त्यामुळे अन्याय होण्याची भीति आहे.

'ज्योत्स्ना' व 'साहित्य' या नियतकालिकांचा संपादक या नात्याने मर्ढेकरांशीं माझा प्रत्यक्ष व पत्रद्वारे अनेकदा संबंध आला. अनेकदा त्यांची माझी भेट होत असे. पण त्यांच्याशीं समरस होण्याइतका माझा त्यांच्याशीं झालेला परिचय दृढ असा कधीच झाला नाही. ते वृत्तीने तसे एकलकोंडेच मला वाटले. भेट झाली की मोठ्या जिव्हाळ्याने बोलत पण अगदी मोजकेंच. स्वतःच्या वाङ्मयनिर्मितीबद्दल बोलायला ते भलतेच उदासीन, अबोल असत. त्यामुळे त्यांच्या कवितांची चर्चा संभाषणांतून वर्ज्यच करावी लागे. स्वतःच्या कवितांचें स्पष्टीकरण अगर समर्थन करण्याचें कटाक्षाने ते टाळीत. त्यावरून हा गृहस्थ कुठे तरी जबरदस्त दुखावला गेला आहे असा एक विचार माझ्या मनांत कां कोण जाणे डोकावून जाई. जीवनाच्या संघर्षांत याला कुठेतरी भयंकर माघार घ्यावी लागली असावी, आपल्या गुणांचे, बुद्धीचें, हुशारीचें, कर्तृत्वाचें चीज समाजांत न झाल्यामुळे यांची उमेद, उभारी, चैतन्य हीं खच्चीं झालीं असावीं म्हणून हा प्राणी बाह्यतः अबोल, अन्तर्यामीं बोलका झाला असावा, असें माझें मन निष्कर्ष काढी. त्या निष्कर्षाच्या आधाराने मी त्यांचा जीवनक्रम तपासूं लागें. मर्ढेकर हुशार असूनहि I. C. S. होऊं शकले नाहीत, विद्वान् असूनहि यशस्वी अध्यापन त्यांना करतां आलें नाही. पत्रकार म्हणून काम करण्याची Times of India मध्ये आलेली संधि त्यांना टिकवितां आली नाही. आत्मज्ञान व बाह्य व्यवहारी जीवन यांचा त्यांना मेळ घालतां आला नाही. जग चुकतें आहे, आपण बरोबर आहों असें त्यांना वाटे. ही विचारसरणी अन्तर्मनांत कायमची ठसली आणि या विचारसरणीचेच पडसाद त्यांच्या भाववृत्तीशीं समरस होऊन काव्यरूपाने बाहेर आले असावे. मनाची अशी वृत्ति एकदा झाली म्हणजे जगांतील विसंगतीकडे विडंबनाच्या दृष्टीने पाहण्याची सर्जनशील मनाला सवय होते. मर्ढेकरांच्या बाबतींत तसेंच झालें असण्याची शक्यता आहे.

इ. स. १९५० साली कवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईला मराठी साहित्य संमेलनाचें जें ३३ वें अधिवेशन झालें तदन्तर्गत काव्यविभागाच्या शाखा–संमेलनाचे अध्यक्ष म्हणून मर्ढेकरांची निवड करण्यांत आली होती. या आपल्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनी 'भावनानिष्ठ समतानतेची विचारसरणी' ( A theory of emotional equivalences ) यासंबंधी आपले मार्मिक नि मौलिक विचार मांडलेले आहेत. संमेलनाचा एक कार्यवाह या नात्याने त्यांचा प्रवासखर्च चुकता केल्यावर कांही वेळ ते नि मी बोलत बसलों होतों. अध्यक्षपदाचा मान दिल्याबद्दल साहित्यसंघाच्या कार्यकर्त्यांचे अनौपचारिकरीत्या आभार मानतांना त्यांचे डोळे कृतज्ञतेच्या भावनेने ओले झाल्याचें दृश्य मीं त्या वेळीं पाहिलेलें आहे. त्याचप्रमाणे साहित्यांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या एका कवितेचा मोबदला देऊं करतांना "माझी कविता तुम्ही छापलीत हेच तुमचे माझ्यावर उपकार आहेत. आणखी वर मोबदला कशाला देतां?" हेहि उद्‌गार कृतज्ञतेच्या जाणिवेनेच त्यांनी काढले होते. या लहानशा प्रसंगांवरून योग्यतेची बूज राखणाऱ्यांच्याजवळ मर्ढेकर कृतज्ञतेच्या अकृत्रिम भावनेने कसे वागत असत हें जसें दिसून येतें, त्याचप्रमाणे त्यांच्या मनांतील खंत कोणती होती यावरहि थोडा-

गेल्या सबंध वर्षात महाराष्ट्राच्या साहित्यिक व सांस्कृतिक जीवनांतील अनेक थोर थोर व्यक्ति एकामागून एक नाहीशा घेऊन महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत मोठीच पोकळी निर्माण झालेली आहे. मर्ढेकरांच्या निधनाने ही पोकळी अधिकच रुंदावली आहे यांत शंका नाही. पण त्यांतल्या त्यांत वर्षाच्या सुरवातीला डॉ. माळेराव व आता वर्षाच्या अखेरीला मर्ढेकर यांचा होणारा कायमचा वियोग हा आणखी बराच काळ माझ्या मनाला तीव्रतेने जाणवत राहील !

वा. रा. ढवळे

## शोकवार्ता

डॉ. के. ल. दप्तरी ( १९-२-५६ ), श्री. ग. वा. ऊर्फ दादासाहेब मावळंकर ( २७-२-५६ ), श्री. बा. सी. मर्ढेकर ( २०-३-५६ ) व श्री. चिं. रा. ऊर्फ चिंतोबा गुरव ( ३-४-५६ ) यांच्या शोचनीय निधनामुळे 'पत्रिके'स व परिषदेस अत्यंत दुःख होत आहे.

---



## नवीन सभासद

### तहह्यात

१ प्रा. श्री. ना. बनहट्टी, पुणें ५.

### साधारण

१ प्रा. प्र. वा. ऊर्ध्वरेषे, खामगाव
२ श्री. नारायणराव अंदनकर, राजुरा-मणिगड.
३ श्री. वि. वि. साठे, कल्याण.
४ श्री. दा. ना. आसमवार, नागपूर.
५ श्री. दि. अं. टाकळकर, पुणें ४.
६ श्री. के. ग. जोशी, पुणें ४.
७ प्रा. मा. प. मंगूडकर, पुणें ४.
८ डॉ. द. न गोखले, सातारा.
९ श्री. दि. ना. विरवे, अकोला (म. प्र.).
१० श्री. गो. ग. कुलकर्णी, मोहोळ.
११ श्री. ल. रा. अंत्रेडी, मुरुम ( हैद्राबाद ).

---

प्रा. म. वा. धोंड

# लापनिका

लावणी या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारें देण्यांत येते. 'लावणें' म्हणजे 'रचना करणें' या मराठी क्रियापदापासून 'रचना' या अर्थी 'लावणी' हें नाम आलें असावें, अशी एक कल्पना आहे; तर 'लापनिका' या संस्कृत शब्दावरून 'लावणी' हा मराठी शब्द आलेला असावा, अशी दुसरी कल्पना आहे.

यांतील पहिली व्युत्पत्ति मराठी-इंग्रजी कोशकार मोल्स्वर्थ आणि महाराष्ट्र शब्दकोश-कार दाते-कर्वे यांनी दिलेली असून, ती मला योग्य वाटते. या व्युत्पत्तीचें समर्थन मी "लावणी म्हणजे काय ?" या लेखांत आणि 'मऱ्हाटी लावणी' या आगामी पुस्तकांत केलें आहे. या लेखांत 'लापनिके'चा विचार करूं.

'लापनिके'वरून लावणी आलेली असावी, असें व्युत्पत्तिकोशकार प्रा. कृ. पां. कुलकर्णी, लावणीचे नामांकित अभ्यासक श्री. म. ना. सहस्रबुद्धे आणि छंदःशास्त्रज्ञ डॉ. ना. ग. जोशी यांचें मत दिसतें. 'व्युत्पत्तिकोशां'त केवळ 'लापनिका' हा शब्द देण्यापलीकडे प्रा. कुलकर्णी यांनी या व्युत्पत्तीचा विचार केलेला नाही. श्री. सहस्रबुद्धे यांनी (१) संस्कृतमध्ये 'लापनिका' नांवाची काव्यरचना होत असे, (२) 'लापनिके'चा उल्लेख 'दशकुमारचरितां'त आढळतो आणि (३) महानुभावग्रंथकार केशवराजसूरि यांचा 'लापनिक' या नांवाचा ग्रंथ आहे; असे मुद्दे वेगवेगळ्या लेखांत मांडले आहेत[1][2]. डॉ. जोशी यांनी (४) 'लापनिका' हा शब्द प्रत्यक्ष लावण्यांत आढळत नसला तरी जुन्या मराठी काव्यांत येतो; आणि (५) त्याचा अर्थ 'सलगीचें बोलणें' असा आहे, असे मुद्दे मांडले आहेत[3].

या व्युत्पत्तीचा ऊहापोह करतांना आपणांस पुढील प्रश्नांचा विचार करावा लागेल. (१) 'लापनिका' या नांवाची संस्कृतमध्ये रचना होती काय ? (२) 'लापनिका' हा शब्द संस्कृत ग्रंथांत कोणत्या अर्थाने आलेला आहे ? (३) मराठी 'लावणी' संस्कृत 'लापनिका' नांवाच्या काव्यप्रकारावरून आलेली असली तर तिचें पूर्वरूप प्राकृतमध्ये दिसून येतें काय ? त्याच-प्रमाणे संस्कृत-प्राकृत या परंपरेने हा काव्यप्रकार इतर भारतीय भाषांत उत्क्रांत झालेला आहे काय ? (४) मराठींत 'लापनिका' हा शब्द 'लावणी' या काव्यप्रकारास उद्देशून योजलेला

---

१. नवभारत, मार्च १९४९.

२. "लोकसंगीत व शास्त्रीय संगीत यांनी नटवलेली शाहिरी कला." मौज १९ ऑक्टोबर १९५२ आणि "Marathi Shahiri Literature." Bharat Jyoti, 31 October 1954.

३. "मराठी छंदोरचनेविषयी दोन टिपणें" महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, वर्ष २९, अंक ११५.



अनुक्रमणिका

आढळतो काय ? आणि (५) ‘ लापनिका ’ हा शब्द मराठींत कोणकोणत्या अर्थांनी योजला जातो ?

‘ लापनिका ’ या नांवाचा काव्यप्रकार संस्कृतमध्ये होता असा पुरावा कुठेच आढळत नाही. ‘ दशकुमारचरितां ’ त या काव्यप्रकाराचा उल्लेख आहे, असें श्री. सहस्रबुद्धे म्हणतात. परंतु शोध करूनहि तो उल्लेख सापडला नाही. संस्कृत भाषेच्या कोणत्याच कोशांत या नांवाचा काव्यप्रकार असल्याचें सांगितलेलें नाही. अन्तर्लापिका, बहिर्लापिका वगैरेसारख्या कूटात्मक रचनेचीं विविध उदाहरणें असलेल्या प्रसिद्ध ‘ सुभाषितरत्नभाण्डागारां ’ तहि ‘ लापनिके ’ चा नमुना दिलेला नाही.

‘ लापनिका ’ हा काव्यप्रकार तर राहूं द्या, परंतु नुसता ‘ लापनिका ’ हा शब्दहि संस्कृतभाषेच्या कोणत्याहि कोशांत आढळत नाही. नाही म्हणावयास मोनियर वुइल्यम्सनी ‘ लापिनिका ’ हा शब्द दिलेला असून त्याचा अर्थ ‘ भाषण वा संभाषण ’ असावा असा तर्क केलेला आहे. या संदर्भात त्यांनी आधार दिला आहे तो ‘ सिंहासनद्वात्रिंशिका ’ या ग्रंथाच्या जैन आवृत्तीचा. हा ‘ लापिनिका ’ शब्द ‘ लप् ’ म्हणजे ‘ बोलणें ’ या धातूवरून आलेला असावा, असा त्यांचा तर्क आहे.

संस्कृतांत नसला तरी प्राकृतांत तरी हा काव्यप्रकार व ‘ लापनिका ’ या शब्दाचें अपभ्रष्ट रूप आढळावें, तर तेंहि नाही. आता ‘ लावणी ’ हा शब्द आणि काव्यप्रकार प्राकृतांत नसला तरी हिंदी, गुजराती, कानडी इ. देशी भाषांत आढळून येतो, ही गोष्ट खरी; परंतु या भाषांचे कोश व इतिहास, हा काव्यप्रकार व तद्वाचक ‘लावणी’ हा शब्द हे दोन्ही मराठींतूनच त्या त्या भाषांत आल्याचें सांगतात; संस्कृत-प्राकृत-देशीभाषा या परंपरेने नव्हे.

खुद्द मराठींतहि ‘ लापनिका ’ या नांवाचा काव्यप्रकार उपलब्ध नाही; एवढेंच नव्हे तर काव्यप्रकाराचें नांव म्हणून हा शब्द कुठे आल्याचें आढळत नाही. ‘लापनिके’ वरून ‘लावणी’ आली असती तर ‘ लापनिका ’ हा शब्द एका तरी लावणींत आला असता. वृत्त, प्रास, यमक, खटका, संस्कृत शब्दांचें आकर्षण यांपैकी कोणत्या ना कोणत्या कारणाने हा शब्द यायला हरकत नव्हती. परंतु ‘कविता’, ‘कवन’, ‘छंद’, ‘चूट’ इत्यादि ‘लावणी’ वाचक शब्द लावण्यांत वारंवार आलेले असून ‘लापनिका’ हा शब्द एकदाहि आलेला नाही. रामजोशांच्या संस्कृत लावण्यांतहि नाही. परंतु काव्यप्रकाराचें नांव म्हणून नसला तरी ‘ ‘लापणीक’ वा ‘लावणिका’ हा शब्द जुन्या मराठी काव्यांत अनेक स्थळीं आलेला आहे. त्यांतील कांही स्थळें पुढीलप्रमाणे:—

१ प्रपंच वाटे लटिका । माया वाटे लापणिका ।
शुद्ध आत्मा विवेका । अंतरीं आला ॥ दासबोध १–९–१६.

२ सदा सर्वकाळ लटिका । बोले मायिक लापणिका ।
क्रिया विचार पाहतां येका । वचनीं सत्य नाहीं ॥ दासबोध ५–३–९०.

३ हें तों तुज कळों येतसे अंतरीं ।
लापणीक, वरी साच भाव ॥ तुकाराम गाथा, चित्रशाळा ९४२.

४ लापनिक शब्दें नातुडे हा देव । तुकाराम गाथा, पंडित १७९४.

५ लापनिक ऐसें मिथ्या त्यांचें मत । अंगीकारूनी प्रस्तुत ।
प्रपंच अनर्थता दावित । दृढ स्थापित वैराग्य ॥ एकनाथी भागवत १०–४१९.

६ कथा अन्वय लापणिका । नामघोष करताळिका ।
प्रसंगें बोलाव्या अनेका । धात माता नेमस्त ॥ दासबोध ४–२–१०.

या सहा उल्लेखांपैकी पांच ठिकाणीं ' लापणिका ' वा ' लापणीक ' याचा अर्थ ' बडबड, मूर्खपणाचें वा लबाडीचें भाषण, खोट्या प्रेमाचें बोलणें ' असा स्पष्ट दिसून येतो. ' सलगीचें बोलणें ' हा अर्थ डॉ. जोशी यांनी कुठून काढला कळत नाही. ' लप् ' म्हणजे ' बोलणें, बडबडणें, कुजबुजणें ' या धातूवरून ' लापणीक ' हा शब्द सरळ आला असावा. ' मूर्खपणाची बडबड, लबाडीचें भाषण, खोट्या प्रेमाचें बोलणें ' वगैरे अर्थाच्या अनेक छटा पुढे त्याला प्राप्त झाल्या असाव्यात. सहाव्या अवतरणांत मात्र या शब्दाचा अर्थ वेगळाच दिसतो. " कथा अन्वय लापणिका । नामघोष करताळिका " ही ओवी कीर्तनाच्या वर्णनांत आली आहे. हरिदासाने कीर्तन कसें रंगवावें, हें सांगतांना ' कीर्तनांत कथा सांगाव्यात, त्या कथांचा परस्परांशीं व अध्यात्माशीं संबंध लावून दाखवावा, नामघोष करावा, टाळ्या पिटाव्यात ' इत्यादि गोष्टी सांगितल्या आहेत. या ठिकाणीं ' लापणिका ' या शब्दाचा अर्थ ' अन्वय, पूर्वापरसंबंध, परस्परसंबंध' इत्यादि. केशवराजसूरि यांनी रचलेल्या ' लापणिक ' ग्रंथांतहि ' लापणिके ' चा हाच अर्थ संभवतो. हा ग्रंथ म्हणजे 'दृष्टान्त पाठ' या ग्रंथांतील १४४ दृष्टान्तांचें विषयवारीने ८ गट करून रचलेली ' दृष्टान्तपाठा ' ची अनुक्रमणिका आहे. ' दृष्टान्तपाठां ' तील सूत्रें या अनुक्रमणिकेंत व्यवस्थितपणें लावलीं आहेत म्हणून ती ' लापणिका '.

' लावून दाखविणें ', ' अन्वय लावणें ', 'परस्परसंबंध स्पष्ट करणें ' हा जो ' लापनिके ' चा अर्थ वर सांगितला, त्या अर्थाने ' लापनिका ' हा शब्द मराठींत रूढ होता. "ग्रंथ वा श्लोक लावून दाखविण्याची रीत, स्पष्टीकरण करण्याची पद्धति" इत्यादि अर्थांनी " अर्थ तर एकच, पण त्या टीकाकाराची लापनिका निराळी, याची निराळी " हें वाक्य ' महाराष्ट्र शब्दकोशां ' त दिलेलें आहे.

आता ' अन्वय लावण्याची पद्धति, श्लोकाचा वा वाक्याचा अर्थ समजून सांगण्याची रीत ' इत्यादि अर्थांनी ' लापनिका ' हा शब्द मराठींत कसा आला असावा, हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. या अर्थाने हा शब्द संस्कृतांत रूढ नव्हता आणि याची तशी व्युत्पत्तीहि सांगतां येत नाही. ' लप् ' म्हणजे ' बोलणें ' किंवा ' बडबडणें '; ' लावणें ' किंवा ' रचना करणें ' नव्हे. ' लग् ' म्हणजे ' लागणें ' या धातूवरून ' लापनिका ' हें नाम सिद्ध होऊं शकत नाही. परंतु मराठींत मात्र ' लापन ' हा शब्द याच अर्थाने रूढ आहे. श्लोकाचा अर्थ सांगण्याकरितां त्यांतील पदांचा अन्वय लावावा लागतो म्हणून ' श्लोकाचा अर्थ सांगणें ' या अर्थी ' श्लोक लावणें ' हा वाक्प्रचार रूढ आहे. याच अर्थाने ' श्लोकलापन ' हा शब्दहि योजतात. त्याचप्रमाणे ' ग्रंथ समजावून देणें ' या अर्थी ' ग्रंथलापन ' हा शब्दहि योजतात. आता ' लापन ' हा शब्द संस्कृत वाटतो, परंतु तो संस्कृत भाषेत आढळत नाही. यावरून ' लावणें ' या मराठी शब्दाचें ' लापन ' हें संस्कृतीकरण असावें असें वाटतें. हा तर्क योग्य असल्यास ' रचना ' या अर्थी ' लावणी ' या शब्दाचें ' लापनिका ' हेंहि संस्कृतीकरण असावें असें म्हणतां येईल. म्हणजे ' लापनिका ' या संस्कृत शब्दावरून ' लावणी ' हा मराठी शब्द आलेला नसून, ' लावणी ' या मराठी शब्दावरूनच ' रचना करणें ' या अर्थाने ' लापनिका ' हा संस्कृत शब्द मराठी पंडितांनी बनविला असावा, असा तर्क करतां येतो. ◆ ◆ ◆

विद्याधर जोहरापूरकर

# मराठींतील जैन वाङ्मय

मराठी भाषेच्या आदिकालांतील इतिहासाशीं जैन धर्माचा घनिष्ठ संबंध आहे. शक ९८३ चा मराठींतील पहिला शिलालेख श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराच्या सुप्रसिद्ध मूर्तीच्या चरणांजवळ आहे. मराठीचें पूर्वस्वरूप असलेल्या अपभ्रंश वाङ्मयांतील बहुतेक ग्रंथ जैन कवींनी लिहिले आहेत. उदाहरणादाखल दहाव्या शतकांतील कवि पुष्पदन्ताचें महापुराण, नागकुमारचरित व यशोधरचरित हे ग्रंथ घेतां येतील.

## जैन ग्रंथकारांची लोकाभिमुख दृष्टि

विदर्भ व मराठवाडा या महाराष्ट्राच्या दोन विभागांत जैनांची वस्ती पुरातन कालापासून आहे. विदर्भांतील कारंजा आणि मराठवाड्यांतील मलखेड व लातूर येथे जैन पट्टाचार्यांचीं पीठें कित्येक शतकांपासून आहेत. अशा स्थितींत मराठींत जैन कवींनी ग्रंथरचना केली असली पाहिजे अशी अपेक्षा असणें साहजिक आहे. कारण जैन ग्रंथकारांची दृष्टि नेहमी लोकाभिमुख असल्याने त्यांनी हिंदी, गुजराती, कानडी, तामिल या भाषांत विपुल ग्रंथरचना केली आहे हें प्रसिद्ध आहे.

मराठी साहित्याचा इतिहास लिहिण्याचे आजवर जेवढे प्रयत्न झाले आहेत त्यांत मात्र जैन कवींच्या लेखनाचा अपवादात्मकसुद्धा उल्लेख आलेला नाही. मराठी वाङ्मयसूचींतहि या शतकांतील किरकोळ पुस्तिकांपेक्षा जास्त ग्रंथांची माहिती मिळत नाही. याचें मुख्य कारण हेंच दिसतें की, या वाङ्मयाचें पुरेसें प्रकाशन झालेलें नाही. जें थोडेंफार झालें आहे तेंहि विद्वानांनी केलेलें नसल्याने फारसें उपयुक्त वाटत नाही.

या स्थितींत परिषदेने आखलेल्या इतिहास-योजनेंत तरी हा विषय उपेक्षित राहूं नये या दृष्टीने आम्ही विदर्भांत उपलब्ध असलेल्या हस्तलिखित व मुद्रित ग्रंथांचा परिचय येथे देत आहों. इतर विद्वान् त्यांत भर घालून तो पूर्ण करतील अशी आशा आहे.

## सर्वांत जुना ग्रंथ

ब्रह्म गुणदासकृत ‘श्रेणिक–चरित्र’ हा ग्रंथ आम्हांला उपलब्ध ग्रंथांत सर्वांत जुना वाटतो. शक १६११ मध्ये लिहिलेली याची प्रत नागपूर येथील सेनगण मंदिरांत आहे. ग्रंथकर्त्याने आपल्या स्थलकालाचा निर्देश केलेला नसला तरी अंदाजाने त्याचा काळ ठरवितां येतो. गुणदास हा ब्रह्म जिनदासाचा शिष्य होता[1] व ब्रह्म जिनदासाचा काळ १५ व्या शतकाचा उत्तरार्ध हा आहे – रामायण रास व हरिवंश रास हे त्याचे राजस्थानी ग्रंथ अनुक्रमें सन १४५९ व सन १४६४ मध्ये लिहिण्यांत आले आहेत.

---

१. शिष्यु सकलकीर्तिदेवाचा। तो जीणदासु गुरु आमुचा। प्रसादु लाधला त्याचा। गुणदासें रवा ॥ ९५ ॥

भ. महावीरांचा समकालीन मगधराज श्रेणिक याची कथा या चरित्रांत दिली आहे. श्रेणिकाची ही कथा चित्तवेधक आहे. त्याच्या पित्याने त्याला लहानपणींच निर्वासित केलें होतें. निर्वासित अवस्थेतच त्याचा नंदा नामक ब्राह्मण कुमारीशीं विवाह होऊन अभयकुमार नामक पुत्र प्राप्त झाला. पुढे आपल्या सावत्र भावाशीं युद्ध करून त्याने राजगृहाचें सिंहासन परत मिळविलें. निर्वासन-काळांत त्याची बौद्ध धर्मावर श्रद्धा बसली होती. पुढे वैशालीच्या लिच्छवि-राज चेटकाची कन्या चेलना त्याची पट्टराणी झाली. तिने यशोधर नामक जैन मुनींच्या तपश्चर्येकडे श्रेणिकाचें लक्ष वेधलें. तेव्हापासून तो जैन धर्माचा उपासक झाला. पुढे भ. महा-वीरांच्या अनेक धर्मसभांत त्याने सहपरिवार जाऊन धर्मोपदेश श्रवण केला. वृद्धावस्थेंत मात्र त्याची अवस्था वाईट झाली. त्याचा मुलगा अजातशत्रु याने राज्यलोभाने त्याला कैदेंत टाकलें व छळ करकरून त्याचा प्राण घेतला.

या चरित्रांत ही कथा सोप्या व रसाळ भाषेंत वर्णिली आहे. श्रेणिक व त्याचा पुत्र अभयकुमार यांच्या चातुर्याच्या कथा चांगल्या रंगविल्या आहेत. नमुन्यानाखल एक प्रसंग असा—

राज्यदूत म्हणति बापू । आम्हासि खावया द्यावे रे जांबू । तुम्हा देउ उष्णकिंवितांवु । कुमरु म्हणे ॥ ३२ ॥ मग विचारि राजदूते । जांवुवे खादली बहुते । उष्ण जांवु आम्हा द्या रे । मग म्हणितले ॥ ३३ ॥ कुमरें मग त घेउनि करी । कुसकरिली टाकली राजकुमरे तली । ते भरली वालुये धुर्ली । मग ते दूत महावर्ली । फुकोनि घेति ॥ ३५ ॥ कुमरु म्हणे फुका गाढी । तुम्हा जळति मिसिया दाढी । ऐसे म्हणोनि हांसति वेडी । वाले गोपाले ॥ ३६ ॥ मग म्हणितिले राजदूते । सिंतरिले आमते । मग म्हणति या पुरुसाते । कोन्ही स्याहाणा नाही ॥ ३७ ॥ अध्याय २.

### यशोधरकथा

नागो आया याने लिहिलेली 'यशोधरकथा' कालक्रमाने दुसरी वाटते. लेखकाने कथेच्या शेवटीं लहानशी प्रशस्ति जोडली आहे[1] पण कालनिर्देश केलेला नाही. कारंजा येथील पट्टाचार्य माणिकसेन यांचा तो शिष्य होता. या माणिकसेनांनी शक १४२४ मध्ये स्थापित केलेली एक मूर्ति नागपूरच्या सेनगण मंदिरांत आहे. यावरून १६ व्या शतकाचा पूर्वार्ध हा नागो आयाचा काल वाटतो.

या कथेची एक प्रत कारंजा येथील बलात्कारगण मंदिरांत आहे.

यशोधर हा एक अतिप्राचीन राजा होता. जीवहिंसेच्या संकल्पाने त्याची अधोगति झाली, पण पुढे गुरुकृपेने त्याला सद्गति प्राप्त झाली अशी ही कथा आहे. यशोधर राजाचा जीव पुनर्जन्मांत अभयकुमार नामक जैन यति झाला व चंडिकेसमोर बळी जाण्याचा प्रसंग त्याच्या-वर ओढवला तेव्हा त्याने आपल्या पूर्वजन्माची ही कथा सांगून लोकांतील बलिप्रथा नाहीशी केली अशा पार्श्वभूमीवर ती निवेदन केली आहे.

---

१ वैराट देसामध्ये कोट नगर । तेथ आदिनाथ असे जगप्रसिद्ध । सिद्ध तीर्थंकर जाणा ॥ सरस्वती मातेच्या प्रसादे । माणिकसेन गुरूच्या अल्हादे । नागो आया म्हणे आनंद । यशोधर ग्रंथ ॥ परिच्छेद ४.

या कथेंत चार परिच्छेद मिळून २६१ ओव्या आहेत व तिची भाषा सोपी व सरळ आहे. नमुन्यादाखल अभयकुमाराच्या उपदेशांतील कांही भाग पाहा–

तेव्हा अभयराचे बोलिला वचनी । आमचे चरित्र कैसे आइकति प्राणी ।
तुम्ही बैसलेत समस्त शस्त्र घेउनी । हिंसेकारणे सर्वजन ॥ ३० ॥
चरित्र असे जीवदयारसाल । तुम्ही अवघे जीवरासीचे काल ।
हे केवि रुचेल विशाल । जीवघातकासी ॥ ३१ ॥
जीवघात केल्या जरी घडे धर्म । तरी जीवदया पालिता कोन कर्म ।
तेथे कैसे असेव कर्म । ते सांगिजो राया ॥ ३२ ॥
जीवहिंसा करिता स्वर्गगति । तरि दया पालिता काय अवगति ।
तरि ते काहर माहर काय पावति । ते सांगिजो राया ॥ ३४ ॥

परिच्छेद १

## पद्मपुराणांतील अनुप्रेक्षा

पद्मपुराणांतर्गत अनुप्रेक्षा हा कालक्रमाने तिसरा ग्रंथ वाटतो. हा गुणकीर्तीनें लिहिला आहे. शक १५२४ मध्ये लघुनंदिग्रामांत लिहिलेली व शक १६२४ मध्ये जिंतुर येथे लिहिलेली अशा याच्या दोन प्रती नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहेत. त्यावरून सन १६०२ पूर्वी त्याची रचना झाली हें स्पष्ट आहे. या ग्रंथांत ३७५ ओव्या आहेत.

वैराग्य दृढ करण्याकरिता बारा धर्मभावनांचें सतत चिंतन करणें याला अनुप्रेक्षा म्हणतात. संसार अनित्य आहे, जीवाचा त्राता त्याच्याहून अन्य कोणीच नाही, संसार दुःखमय आहे, जीव सर्वस्वीं एकटा आहे, इतर सर्व त्याच्याहून भिन्न आहेत, संसार अपवित्र आहे, पापकर्मांनी जीव बद्ध होण्यास आरंभ होतो, शुभ भावनांनी कर्मबंधनाची प्रक्रिया थांबते, तपश्चर्येने कर्मांचा नाश होतो, जगताचें स्वरूप सर्वज्ञांनी वर्णिलें आहे, ज्ञान अत्यंत दुर्लभ आहे व धर्म हाच सर्वश्रेष्ठ आहे या त्या बारा भावना होत. ग्रंथाच्या भाषेच्या परिचयाकरिता ज्ञानदुर्लभतेचें वर्णन पुढे देतों–

दुर्लभ निर्मल वैराग्य । जे कीजे सर्वसंगत्याग । अनुयोग धर्मी अनुराग । दुर्लभ देखा ॥ ३४ ॥ दुर्लभ परम गुण ग्रहण । दुर्लभ परिसहसहन । व्रतविधाननिर्वहन । हे दुर्लभ देखा ॥ ३५ ॥ दुर्लभ परमार्थाची लब्धि । दुर्लभ सिद्धांताची अवधि । दुर्लभ प्रनवाची सिद्धि । सर्वप्रकारें ॥ ३६ ॥

कारंजा येथील पट्टाधीश धर्मचंद्र यांचा शिष्य वीरदास याने सुदर्शनचरित शक १५४९त लिहिलें आहे. कवीने आपली विस्तृत प्रशस्ति शेवटीं जोडली आहे.[1] त्याचा जन्म सोहितवाल ज्ञातींत झाला असून यतिदीक्षेनंतर त्याचें नांव पार्श्वकीर्ति असें होतें असें या प्रशस्तीवरून कळतें. या ग्रंथांत २९ प्रसंग मिळून १६४५ ओव्या आहेत.

---

१ सोहितवाल प्रथम याती । ते वंसी जया जन्म स्थिती । धर्मचंद्र गुरु दीक्षापती । नाम स्थिती वीरदास ॥५४॥ पुढती दीक्षा महाव्रती । गुरु धर्मचंद्र समर्थ । मस्तकी ठेउनी हस्त । पासकीर्ति नामना ॥५५॥ शके पंधरासे येकुनवचास । प्रभव संवत्सरनाम वर्ष । फाल्गुण वद्य दशमी दिवस । गुरुवासुर ते दिनी ॥५६॥ प्रसंग २९,

भ. महावीरांच्या वेळीं झालेली राजगृहांतील सेठ सुदर्शन याची कथा या ग्रंथांत सांगितली आहे. सुदर्शन हा अत्यंत सुंदर पण अत्यंत धर्मनिष्ठ होता. राणी अभयमतीचें मन त्याच्यावर बसलें पण तिची इच्छा पुरी न होऊं शकल्याने तिने त्याच्यावर अतिप्रसंगाचा आळ आणला. क्रोधाविष्ट राजाने त्याला फाशीची शिक्षा दिली पण शेवटीं नमस्कारमंत्राच्या माहात्म्याने त्याची सुटका झाली अशी ही कथा आहे. कवीने यांत वेळोवेळीं अनेक धर्मतत्त्वांची चर्चा केली आहे. विशेषतः १५ ते १७ या तीन प्रसंगांतील सम्यग्दर्शन, सम्यक् ज्ञान व सम्यक् चरित्र यांचें वर्णन विस्तृत आहे. ग्रंथाच्या शैलीची कल्पना पुढील उताऱ्यावरून येऊं शकेल–

राव म्हने जी तये वेळा । वेगि करावी अवकळा । याशि घालि रे शस्त्र गळा । मसनमाला लाउनी ॥ ११ ॥ सुदर्शनु बांधोनि काढिला । चाहोटा चौबारा आनिला । सकल लोकिं तो देखिला । राये केला अन्यावो ॥ १२ ॥ दृढ बंधनि तो बांधला । राय निरोपु जी दिधला । मग मारावया काढिला । तो आनिला समसानी ॥ १३ ॥ हाहाकार वर्तला नगरी । रोदना करिती नरनारी । सुदर्शना कैसो जाली परी । राया घरी अनर्थ ॥ १४ ॥ रोदना करिती सर्व लोक । थोर करिती मनशोक । राव जाला तो अविवेक । जनलोक बोलति ॥ १६ ॥

हा ग्रंथ नागपूर येथे बऱ्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला आहे.

## हरिवंशपुराण–

यानंतर कालक्रमाने 'हरिवंशपुराण' हा ग्रंथ येतो. याचा आरंभ देवगिरी येथील उज्जंतकीर्ति आचार्यांचा शिष्य जिनदास याने केला[1]. पण तो पूर्ण लेखन करू शकला नाही. त्याचा हा खंडित ग्रंथ अजितकीर्ति आचार्यांचा शिष्य पुण्यसागर याने पूर्ण केला.[2] या दोघांनीहि काला निर्देश केलेला नाही. आचार्य अजितकीर्ति यांनी शक १५७६ मध्ये स्थापित केलेली एक मूर्ति बाळापूर येथे आहे. त्यावरून १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात त्यांचा शिष्य पुण्यसागर याने हें लेखन केलें असावें असें दिसतें.

या ग्रंथांत पूर्वार्धात ४० व उत्तरार्धात १८ अध्याय आहेत. समग्र महाभारताची जैन कथा यांत वर्णन केली आहे. याच्या आरंभीच्या ५२ ओव्यांत अनेक पूर्ववर्ती आचार्यांचें स्मरण केलें आहे. वर्धा येथे बऱ्याच वर्षांपूर्वी याचें प्रकाशन झालें होतें. याची वर्णनशैली पुढील उताऱ्याहून लक्षांत येऊं शकेल.

तव दिवसु अस्तमानेसी गेला । निशि अंधकारु प्रवेशला । वनमाळा आनिली मंदिरा । राजा देखिला मंचकी ॥३६॥ तव भावे राजा उठला झडकरी । प्रीति आलिंगिली दोही करी । मग ते आनोनि मंचकावरी । सुख भोगिता जाला ॥३७॥ ते संतुष्ट जाहली दोघे । तव निवाली सर्वांगे । वनमाळा म्हणे वेगे । राजया पाठवी घरासी ॥३८॥ तुझिया रूपाची अतिप्रीति । मज नाही जाली तृप्ती । मज सांडोनि केउती । जाउ पाहसो चतुरे ॥३९॥ ऐसी करुनी राखिली

---

१ श्रीमहास्थानक देवगिरी । जिनदासु नामा जन्मला त्या नगरी । तेथे असे उज्जंतकीर्ति आचारी । त्याने पंडित केला ॥५०॥ पर्व १.-

२ भट्टारक श्रीअजितकीर्ति । माउली आमची पुण्यमूर्ती ।...॥५८॥ ही हरिवंश कथा गोमटी । मऱ्हाष्ट भाषा अमृतघटी । खंड पूर्ण केला सेवटीं । पुण्यसागरें ॥ पर्व ५८.

सुंदरी । सुख भोगिता जाला इच्छेवरी । प्रेम कटाक्ष बांधिला जरी । पूर्व ज्ञान न विचारिता ॥४०॥ प्रसंग ५.

पुण्यसागराने १८० श्लोकांची आदित्यवारव्रत कथाहि लिहिली आहे. एका व्यापाऱ्याच्या सात मुलांवर आलेलीं नानाप्रकारचीं संकटें रविवारव्रत करून पार्श्वनाथ तीर्थंकराचें पूजन केल्याने दूर झालीं असें या कथेचें सूत्र आहे. तिची प्रशस्ति अशी —

श्रीमूलसंघ वागेश्वरी गच्छ । बलात्कारगण जाणिजे प्रत्यक्ष । गुरु अजितकीर्तीने केली साक्ष । श्रवणमात्रें ॥१७९॥ सिक्ष विनती करितो तुम्हा । कवि बोले पुण्यब्रह्मा । स्वामी कृपा करावी आम्हा । जन्मोजन्मी ॥१८०॥

या कथेची एक प्रत नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहे.

कारंजाचे पट्टाधीश धर्मचंद्र[१] यांचा शिष्य गंगादास हा कालक्रमाने सातवा लेखक वाटतो. याने शक १६१२ मध्ये 'यशोधरचरित' लिहिलें. याची भाषा व्याकरणदृष्ट्या फार शुद्ध आहे. याची एक प्रत कारंजा येथील सेनगण मंदिरांत आहे. याची कथा नागो आयाच्या ग्रंथासारखीच आहे. मूळ प्रत समोर नसल्याने यापेक्षा अधिक परिचय या वेळीं येथे देतां आला नाही.

## पार्श्वनाथ भवांतर

त्याच वर्षी गंगादासाने 'पार्श्वनाथ भवांतर' हें ४७ कडव्यांचें गीत लिहिलें. तेविसावे तीर्थंकर भ. पार्श्वनाथ यांच्या दहा पूर्वजन्मांच्या कथा या गीतांत सांगितल्या आहेत. अमात्य मरुभूति, वज्रघोष हत्ती, शशिप्रभदेव, राजकुमार अग्निवेग, विद्युत्प्रभ देव, चक्रवर्ती वज्रनाभि, ग्रैवेयकइन्द्र, महाराज आनन्द व आनत इन्द्र असे नऊ जन्म घेतल्यानंतरच भगवान् पार्श्वनाथांचा आत्मा तीर्थंकरपद प्राप्त करूं शकला. गंगादासाने या सर्व कथेचें संक्षेपाने चांगलें चित्रण केलें आहे. या गीताची एक प्रत नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहे. तिची प्रशस्ति अशी—

सके सोलासे वर बारा सुध पुस मास । प्रमोद संवत्सर सुक्रवार त्रयोदस । कीर्तन पूर्ण जाले धर्मचंद्रचा आदेस । त्याहाचा पंडित अल्पमति गंगादास ॥ जिनगुणाचे कीर्तन । भवांतर केले डफगाण । कवित्व केले गंगादासान । तुम्ही आइका चित्त देउन ॥ ४७ ॥

## महीचंद्रांची ग्रंथरचना

यानंतर कालक्रमाने महीचंद्र यांचा उल्लेख करावा लागेल. हे भट्टारक विशालकीर्तींचे शिष्य होते. यांच्या चार रचना उपलब्ध आहेत. यांचें 'आदिपुराण' आशापुर येथे शके १६१८ मध्ये पूर्ण झालें.[२] ब्रह्म जिनदासकृत गुजराती ग्रंथाच्या आधारें यांत पहिली तीर्थंकर ऋषभदेव

---

१. हे धर्मचंद्र उपर्युक्त धर्मचंद्र (पार्श्वकीर्तीचे गुरु) यांच्या परंपरेंतील चवथे पट्टाधीश होत.

२. शके सोळाशे अष्टादश । धाता नाम संवत्सर सुरस । माघ वद्य पंचमी तिथीस । वार रवि पै ॥ भरतक्षेत्रामध्ये जाण । आशापुर पुण्यपावन । मूळ नायक शांतिजिन । चैत्याला पै ॥ विशाळकीर्तीचे कृपेण । महीचंद्रे अज्ञानपण । ग्रंथ केला संपूर्ण । स्वहस्ते पै ॥

यांची कथा वर्णिली आहे; मद्रासच्या शासकीय ग्रंथालयांतील हस्तलिखित प्रतीवरून लिहिलेला याचा परिचय विविधज्ञानविस्तारांत ( मे १९२४ ) प्रकाशित झाला होता. पुढे मूळ ग्रंथहि प्रकाशित झाला. सध्या तो उपलब्ध नसल्याने यापेक्षा अधिक परिचय येथे देतां येत नाही.

आषाढ, कार्तिक व फाल्गुन या तीन महिन्यांत अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत आठ दिवस जैन मंदिरांत नंदीश्वर जिनमूर्तींची पूजा उत्सवपूर्वक करण्यांत येते. या अष्टान्हिकव्रताच्या माहात्म्यावर आधारलेली १५० पद्यांची कथा ही महीचंद्रांची दुसरी रचना होय. या कथेच्या प्रशस्तीमध्ये त्यांच्या गुरुपरंपरेचा उल्लेख येतो.*

गरुडपंचमीकथा ही ८९ पद्यांची कथा ही महीचंद्रांची तिसरी रचना होय. या कथेची प्रशस्ति अष्टान्हिककथेसारखीच आहे.[1] गरुडपंचमी व्रताचें यांत केलेलें वर्णन संक्षेपाने असें आहे–

श्रावण शुद्ध पंचमीसी । उपोषण करावें ते दिवशीं । आरंभ करावा न्हवनासी । चैत्यालांत ॥ ४१ ॥ मन वाचा काया शुद्ध करून । भावे करावे पूजन । पाच वर्षे पर्यंत जाण । व्रतालागी आचरिजे ॥ ४७ ॥

या दोन्ही कथांची प्रत नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहे.

बाविसावे यदुवंशीय तीर्थंकर नेमिनाथ यांची कथा वर्णन करणारें ९५ कडव्यांचें गीत ही महीचंद्रांची चवथी रचना होय. यांत त्यांच्या पूर्वजन्मांचीहि कथा सांगितली आहे. हें गीत कांहीं वर्षांपूर्वी वर्धा येथे प्रसिद्ध झालें होतें. यांतील कित्येक प्रसंगांचें चित्रण चांगलें साधलें आहे. उदाहरणादाखल नेमिनाथांच्या दीक्षेचें वर्णन पाहा–

नेमि म्हणे बळिभद्रा आणि त्या कृष्णासी । राज्य नलगे असू द्यावे तुमचे तुम्हापासी । खुंटले माझे येणे ऐका मानसीं । बंधु क्षमा करावी मज तुम्ही अज्ञानासी ॥ ८७ ॥ संयमभार घेउनी कर्म दहन करीन । ऐक श्रीकृष्णदेवा सत्य हे वचन । नेमीने कृष्णाशी दिले धाउन आलिंगन । म्हणे कृष्णा अखेरची भेट तुझी माझी जाण ॥ ८८ ॥

याचीहि प्रशस्ति वरील कथांसारखीच आहे.[2] महीचंद्रांचें नांव क्वचित् माहेश्चंद्र असेंहि छापलेलें आढळतें. या चार रचनांशिवाय कांही आरत्या व स्तोत्रेंहि त्यांनी लिहिलीं आहेत.

महीचंद्रांचे शिष्य महाकीर्ति यांनी 'शीलपताका' हा ५५२ ओव्यांचा ग्रंथ लिहिला आहे. याची एक जीर्ण प्रत आमच्या संग्रहीं आहे. माणिकचंद्र नामक श्रीमंत तरुण वेश्येच्या नादीं लागलेला असतो पण त्याची पत्नी चंपावती आपल्या चातुर्याने व पातिव्रत्याने त्याला पुन्हा सन्मार्गी आणते ही यांतील मुख्य कथा आहे. याची प्रशस्ति लहानशीच आहे. तीवरून कर्त्यांच्या गुरूचें नांव कळतें.[3] कित्येक प्रसंगांचें वर्णन चांगलें साधलें आहे.

---

* तदाम्नाय गुरु अजितकीर्ति । तत्पटी सूरि विशालकीर्ति । महाविशाल तयाची मूर्ति । धर्म स्थापिला ॥ १४६ ॥ महीचंद्र म्हणे मी रंक ।

१. तत्पट्टोधर विशालकीर्ति । विशाल आहे तयाची मति । तत्पदपंकजसेवक यति । महीचंद्र ॥ ८७ ॥

२. श्रीगुरु विशालकीर्ति । धर्मभाविक मूर्ति । त्यांचे शिष्य महीचंद्र । म्हणे हो तयाप्रति ॥ ९४ ॥

३. महीचंद्र माझी माउली । थोर कृपेची साउली । महाकीर्तीस ठेवणी दाविली । शीलपताकेची ॥ ५५१ ॥

उदाहरणार्थ माणिकचंद्राच्या लग्नाचें वर्णन पाहा—

वऱ्हाडी मिरविले अपार। सिनगारी ते जितु स्वार। होती वाजंत्राचे गजर। न आयके। शब्द पै ॥ ९२ ॥ नवरा सिनगारिला अनेकापरी । छत्र दिल माथ्यावरी । माहि मर्तोबा सिरीगिरी । सजती पुढे ॥ ९३ ॥ तगटी निसान झलकति । पुढे हातनाला सुटति । जंबुऱ्या-च्या गर्जना होति । नानापरीचे देखा ॥ ९४ ॥

लक्ष्मीचंद्र यांनी शके १६५० मध्ये लिहिलेली 'मेघमालाव्रतकथा' ६९ ओव्यांचीच आहे; पण तिची प्रशस्ति वैशिष्टयपूर्ण आहे[1]. मेघमाला हें व्रत भाद्रपदाचे पहिले पांच दिवस करीत असतात. त्याच्या अनुष्ठानानें श्रेष्ठी वच्छराज याला प्राप्त झालेल्या उत्कृष्ट फलाचें वर्णन या कथेंत केलें आहे. या कथेची एक जीर्ण प्रत आमच्या संग्रहीं आहे.

कारंजाचे पट्टाधीश देवेंद्रकीर्ति[2] यांचे शिष्य जिनसागर यांच्या बारा रचना उपलब्ध आहेत. यांतील २१४ ओव्यांची जिनकथा ही कालक्रमानें पहिली होय. शक १६४९ मध्ये कारंजा येथे तिची रचना झाली[3]. या कथेंत संक्षेपानें चोवीस तीर्थंकरांचीं चरित्रें ग्रथित केलीं आहेत. पार्श्वनाथ तीर्थंकरांच्या पुढील वर्णनावरून यांच्या शैलीची कल्पना येऊं शकेल—

वाराणसी अश्वसेन राय । वामाराणी पार्श्वमाय ।
एकशत वर्ष आय । उग्रवंशी ॥
नवहस्त उंच काय । दश गणधर सेव्य पाय।
तो वंदिला त्रिभुवणराय । नीळवर्ण ॥

या कथेच्या दोन प्रती नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहेत.

## जिनसागरांची रचना.

भाद्रपद शुद्ध पंचमीपासून नवमीपर्यंत करण्यांत येणाऱ्या पांच मेरुपर्वतांवर असलेल्या जिनमंदिरांच्या पूजेला पुष्पांजलिव्रत म्हणतात. पद्मावतीदेवीच्या उपदेशावरून प्रभावतीनें हें व्रत आचरिलें व त्यामुळे तिला उत्तम फळ प्राप्त झालें हें जिनसागरांच्या 'पुष्पांजलिकथा' या तिसऱ्या रचनेचें कथासूत्र आहे. आमच्या संग्रहीं असलेल्या या कथेच्या प्रतीची पुष्पिका अशी—

इति श्रीदेवेंद्रकीर्तिप्रियसिष्याजिनसागरकृत पुष्पांजलिव्रतकथा संपूर्ण समाप्त ॥ शके १६ सोलाशे साठ ६० ॥

या कथेंत विविध वृत्तांतील १०२ श्लोक आहेत.

---

१. मान नाम नगर रम्य । ये चंद्रप्रभ जिनालय । गुरु वंदिला महायती । कृपासागर ॥६६॥ लक्ष्मीचंद्रकृतकथा । जानिजे तुम्ही समर्था । मेघमाला व्रतकथा । संपूर्ण जाली ॥ ६७॥ सके सोलाशे पंनास। जेष्ट सुद प्रदिपदास । अइतवारी पूर्ण वेश । पूर्ण केली ॥६८ ॥ कडतासा रेवडिने आणिली । कडतासा कमलापुरेन प्रगट केली । गोविंदा कवड्याने गाविली । सभेमाजि ॥ ६९ ॥

२. हे देवेंद्रकीर्ति उपर्युक्त धर्मचंद्र ( द्वितीय ) यांचे शिष्य होत.

३. नृप सालिवाहन सके गनित । सोळाशे एकोनपंचाशत । प्लवंग नाम संवत्सरांत । पूर्ण कथा ॥ २०८ ॥ वराड देश कारंज नगर । श्रीमच्चंद्रनाथ मंदिर । तेथ कथा हे सुंदर । संपूर्ण केली ॥ २०९ ॥

भ. महावीरांच्या वेळीं झालेला हेमांगद देशाचा राजा जीवंधर याची कथा जैन लेखकांत फार लोकप्रिय आहे. जीवंधर हा राजपुरीचा राजपुत्र, पण तो जन्मण्यापूर्वीच त्याच्या पित्याचा विश्वासघाताने वध झाला. जीवंधराला आपलें बालपण शहरांतील एका व्यापाऱ्याच्या घरीं अज्ञातवासांत काढावें लागलें. तारुण्य प्राप्त झाल्यावर प्रवास करीत असतां त्याने देशोदेशींच्या आठ युवतींशीं विवाह केले व शेवटीं मामाच्या साहाय्याने आपल्या पित्याचें राज्यहि मिळविलें. पुढे भ. महावीरांच्या धर्मसभेंतील एक प्रमुख मुनि म्हणून जीवनाचा अंतिम काळ व्यतीत करून त्याने निर्वाण प्राप्त केलें. जीवंधराची ही कथा संस्कृतमधील गुणभद्रकृत उत्तर-पुराणांत प्रथम आढळते. तिच्या आधारें ब्रह्म जिनदासाने एक गुजराती रास लिहिला होता. या दोन्हींच्या आधारें जिनसागरांनी १० अध्याय मिळून १५३० ओव्यांचा 'जीवंधर पुराण' हा ग्रंथ शके १६६६ मध्ये शिरड येथे लिहिला.[1]

जीवंधर–पुराणाची कथा रोचक आहे तशीच लेखनशैलीहि आहे हें पुढील प्रवासवर्णनावरून लक्षांत येऊं शकेल–

ऐसी करीत वंदना देवगुरूसी । तव वाटेत नदी आली कैसी । दोही थडी वनवृक्षासी । शीतळ छायेसी दिसत ॥ १६२ ॥ त्या नदीमध्ये तापसी । तप सहस्र करिती मिथ्यामतासी । जटा वाढविल्या डोईसी । करिती स्नानासी पहा हो ॥ १६३ ॥ एक करिती पंचाग्निसाधन । एक कंदमूळ भक्षिती जाण । एक मस्तकी राहिला शिळा धरून । अज्ञानपण पहा हो ॥१६४॥ कोणी खाये पत्रफुले । कोणी खाये उंबर फळे । ऐसे न जाणती अज्ञानबळे । पाप केवळ आचरती ॥ १६५ ॥ अध्याय ७.

हा ग्रंथ वर्धा येथे प्रकाशित झाला होता. त्यांच्या रविवारकथेमध्ये १२३ श्लोक आहेत. तिचा रचनाकाल शक १६४६ असून[2] कथासूत्र पुण्यसागरांच्या कथेसारखेंच आहे.

लवअंकुशकथा व अनंतव्रतकथा या जिनसागरांच्या दोन रचना शिरड येथे एकाच वर्षीं समाप्त झाल्या आहेत. दोन्हींची प्रशस्ति सारखीच असून त्यांत कालनिर्देश केला आहे[3]. परंतु त्यांतील 'पुत्र' हा कोणत्या अंकाचा संकेत असावा हें आम्हीं निश्चित करूं शकलों नाही. सीतेचा दुसरा वनवास, रामाचें त्याच्या पुत्रांशीं झालेलें युद्ध व सीतेची अग्निपरीक्षा ही कथा लवअंकुशकथेच्या ८० श्लोकांत येते. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीला पूर्ण होणाऱ्या तीन दिवसांच्या

---

१. कांही गुजराती राम । पाहून केले कथेस । कांही उत्तरपुराणास । पाहोनि ग्रंथास रचिले ॥ १९२ ॥ शके सोळाशे सहासष्ट जाण । आनंद नाम संवत्सर महान् । वैशाखमास द्वादशी दिन । कथा पूर्ण ही झाली ॥ १९३ ॥ जेथे शिरड नाम नगर । शांतिनाथाचे मंदिर । श्रावक लोक वसती अपार । सांगे जिनसागर श्रोतियांसी ॥ १९४ ॥ अध्याय १०.

२. या कथेची प्रत आम्हांला नंतर मिळाली. या कालनिर्देशावरून हीच जिनसागरांची पहिली रचना ठरते. "रसाब्धिषट्चंद्र जई शकासी" असे मूळ शब्द आहेत.

३. आहे बरा सीरड ग्राम जेथे । राहे बहू श्रावक लोक तेथे ॥ त्रिपुत्रषट्चंद्र शकासी जेव्हा । कथी असी हे परिपूर्ण तेव्हा ॥ ७९ ॥

अनंतव्रताचें माहात्म्य अनंतकथेंत वर्णिलें आहे. या कथेंत ७३ श्लोक असून तिच्या मंगलाचरणांत जैनांची देवताविषयक कल्पना चांगल्या रीतीनें व्यक्त झाली आहे.[1]

कालनिर्देश नसलेल्या तीन आणखी व्रतकथा त्यांनी लिहिल्या आहेत. सुगंधदशमी हें व्रत भाद्रपद शुद्ध दशमीला करतात. त्या दिवशीं सुगंधी द्रव्यांच्या धुरानें सर्व मंदिर भरून टाकण्याची पद्धति अजूनहि जैन समाजांत रूढ आहे. या व्रताच्या कथेंत १३६ श्लोक आहेत. या कथेंतील प्रसंग ७३ चित्रांत दर्शवून लिहिलेली एक सुंदर प्रत नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत आहे. मागच्या वर्षी झालेल्या प्राच्यविद्या परिषदेंत ती प्रदर्शित करण्यांत आली होती.

कलशदशमी हें व्रत श्रावण शुद्ध दशमीला करतात. याच्या कथेंत ११३ श्लोक आहेत. याच्या अंतिम श्लोकांतील विनयोक्ति परंपरेला साजेशीच आहे–

ऐसी कथा हे जिनराज बोली । श्रीसद्‌गुरूनें परिपूर्ण केली ॥
निमित्त केले जिनसागराला । यालागि मी वंदितसे बुधाला ॥

भाद्रपद शुद्ध सप्तमीला सप्तमी व्रत करतात. याच्या कथेंत ११३ श्लोक आहेत. याची प्रशस्ति अशी–

श्रीकुंदकुंदान्वय त्याच वंशी । देवेंद्रकीर्ति प्रिय सज्जनांशी ॥
जैनादि हो सागर शिष्य त्यास । त्याने कथेचा रचिला विलास ॥

मानतुंग आचार्यांचें संस्कृत भक्तामरस्तोत्र जैन समाजांत अत्यंत लोकप्रिय आहे. जिनसागरांनी ५० श्लोकांत याचा समश्लोकी सुबोध अनुवाद केला आहे. मूळ स्तोत्राप्रमाणेच हा अनुवादहि अत्यंत रसाळ झाला आहे. हा अनुवाद बाहुबली येथील सन्मति मासिकांत नुकताच प्रकाशित झाला आहे (जानेवारी १९५६). नमुन्यादाखल याचा एक श्लोक पाहा–

हे स्तोत्रमाळ जिनजी तुझिया गुणांची । नाना सुवर्णरचना रचिली फुलांची ॥
कंठीं धरील नर जो शुभभक्ति लक्षी । तो मानतुंग पद पावल एकलक्षी ॥४९॥

कर्नाटकांतील हुंबच येथे पद्मावती देवीचें प्रसिद्ध मंदिर आहे. या देवीची पार्श्वनाथ तीर्थंकरावर अतिशय भक्ति असल्यानें ती जैनांतहि पूज्य मानली जाते. 'कैको' या १५ कडव्यांच्या गीतांत ही देवी श्रोत्यांना निरनिराळीं कोडीं घालते अशी जिनसागरांनी कल्पना केली आहे. या गीताचा आरंभ असा–

पार्श्वनाथ देव दादा हुमस माझ गांव । दूरिल माझा देश माझ पद्मावती नांव ।

पार्श्वनाथ व शांतिनाथ या तीर्थंकरांचीं आणि पद्मावती व क्षेत्रपाल या देवतांचीं अशीं चार भक्तिपूर्ण स्तोत्रें जिनसागरांनी लिहिलीं आहेत. याव्यतिरिक्त त्यांच्या कित्येक आरत्याहि प्रसिद्ध झाल्या आहेत.

## इतर ग्रंथकारांची रचना

जिनसागरांनंतर त्यांच्याचप्रमाणें विपुल लेखन करणारे महतिसागर यांचा उल्लेख केला पाहिजे. यांचा जन्म शक १६९४ मध्ये व स्वर्गवास शक १७५४ मध्ये झाला. कारंजाचे पट्टाधीश देवेंद्रकीर्ति ( उपर्युक्त देवेंद्रकीर्तींचे प्रशिष्य ) हे त्यांचे गुरु होते. अभंग, पदें इत्यादि त्यांच्या कवितेचा एक संग्रह प्रकाशित झाला आहे. शक १७२३ मध्ये रिद्धपूर येथे लिहिलेली

१. श्रीनाथ दीजे सुख सज्जनाला । याकारणे शंकर नाम याला ॥
ज्ञाने सदा सर्वही व्यापलाहे । तो विष्णु ऐसे जग बोलताहे ॥ १ ॥

रविवारकथा व शक १७३२ मध्ये बाळापूर येथे लिहिलेली आदिनाथ पंचकल्याणिककथा या त्यांतील प्रमुख रचना होत.

त्यांचे समकालीन भट्टारक विशालकीर्ति यांनी 'धर्मपरीक्षा' हा ग्रंथ शक १७२९ मध्ये लिहिला. पुराणांतील कित्येक कथा किती असंभव आहेत त्याचें यांत मनोरंजक वर्णन केलें आहे. ब्रह्म जिनदासकृत ग्रंथाच्या आधारें याची रचना झाली आहे.

सकलभूषण यांनी १६ व्या शतकांत संस्कृतमध्ये षट्कर्मोपदेशरत्नमाला हा ग्रंथ लिहिला होता. याचा मराठी श्लोकबद्ध अनुवाद भट्टारक सिद्धसेनांचे शिष्य रत्नकीर्ति यांनी अमरावती येथे शक १७३४ मध्ये केला आहे. यांत चाळीस अध्याय असून त्यांत देवपूजा, गुरुसेवा, शास्त्राभ्यास, संयम, तपश्चर्या व दान या पुण्यकर्मांचें माहात्म्य वर्णन केलें आहे.

वरील ग्रंथांव्यतिरिक्त नागपूरच्या उपर्युक्त मंदिरांत पंडित सूरिजनकृत परमहंस व मेघराजकृत यशोधरचरित्र हे कालनिर्देश नसलेले ग्रंथ उपलब्ध आहेत. परमहंस हें एक रूपककाव्य आहे. चेतना राणीची प्राप्ति जीवराजाने अतिशय कष्ट सहन करून केली हा याचा सारांश आहे. यशोधरचरित्र उपर्युक्त यशोधरचरित्रांच्या पद्धतीवरच लिहिलें आहे. या दोन्ही लेखकांनी ब्रह्म शांतिदास यांचा गुरु म्हणून उल्लेख केला आहे. उपर्युक्त ब्रह्म जिनदासांच्या एका शिष्याचें नांव शांतिदास होतें. हे दोन शांतिदास एकच असतील तर ग्रंथांचा काळ सोळाव्या शतकाचा पूर्वार्ध मानावा लागेल.

याप्रमाणे जुन्या पद्धतीच्या मराठी जैन वाङ्मयाच्या या संक्षिप्त परिचयावरून महाराष्ट्रांतील जैन समाजाच्या स्थितीविषयी व अभिरुचीविषयी बरीच कल्पना येते. उपलब्ध वाङ्मय पंधराव्या शतकापासूनचें आहे. त्यापूर्वीही बरीच वाङ्मयनिर्मिति झाली असणें शक्य आहे. विद्वानांचें लक्ष या उपेक्षित विषयाकडे आकृष्ट करावें एवढाच प्रस्तुत लेखाचा हेतु आहे.

◆ ◆ ◆

डॉ. रा. ग. हर्षे

# मुकुंदमुनींचें गुह्यसप्तक

श्रीमुकुंदराज ह्यांच्या कालासंबंधी व चरित्रासंबंधी अनेक वादग्रस्त प्रश्न अजून शिल्लक आहेत. मराठीच्या आद्यकवित्वाचा त्यांचा अग्रहक्क अद्याप संशयातीत ठरलेला नाही. अशा स्थितींत त्यांच्या नांवावर मोडणारें सर्व अप्रसिद्ध वाङ्मय मिळेल तसतसें प्रसिद्ध झालें पाहिजे तरच त्यांतून कांही तरी नवीन माहिती उजेडांत येण्याचा संभव आहे.

अभ्यासकांच्या सोईसाठी मुकुंदराजविषयक हे वादग्रस्त प्रश्न कोणते आहेत त्यांचा थोडक्यांत येथे निर्देश केल्यास तें अप्रस्तुत होणार नाही.

१. मुकुंदराजांच्या कालाबद्दलचा कसलाच उल्लेख विवेकसिंधूच्या छापील पोथ्यांत आढळत नाही, ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेविली पाहिजे. छापील आवृत्त्या पुढीलप्रमाणे उपलब्ध आहेत :

(१) गोंधळेकर, शिळाछाप, सन १८७५; (२) रघुनाथ भास्कर गोडबोले, सन १८७५; (३) वि. कृ. आठल्ये, सन १९११.

२. "शके अकरा दाहोत्तरू। साधारण संवत्सरू। राजा शारङ्गधरू। राज्य करी ॥१॥ ऐसा समयो सर्वोत्तमु। तेथ मुकुन्द द्विजोत्तमु। विवेकसिन्धु मनोरमु। निर्मिता झाला ॥" हा उल्लेख भा. इ. सं. मंडळाचा ग्रंथसंग्रह व कै. स. म. दिवेकर यांचा ग्रंथसंग्रह यांतील विवेकसिंधूच्या पोथ्यांत सापडतो असें कै. वि. ल. भावे म्हणतात (म. सा. पृ. ३७). कै. वि. का. राजवाडे यांनी असलाच उल्लेख चांदोरकरांच्या जवळच्या पोथींत असल्याचें म्हटलें आहे. ('मुकुंदराजांचा एक संस्कृत ग्रंथ,' पृ. ११४, ओवी क्रमांक १३३, अध्याय ११, उत्तरार्ध-भा. इ. सं. वा. इ. शके १८३५). हा उल्लेख विद्यमान उपलब्ध पोथ्यांपैकी किती पोथ्यांत आढळतो याचा शोध करणें अगत्याचें आहे. कारण शारंगधरराजा त्या काळीं राज्य करीत असल्याचें स्पष्ट झालें तर जयंतपाळ हा भावे यांनीच म्हटल्याप्रमाणे मुकुंदराजाचा आश्रयदाता कोणी तरी धनिक समजला पाहिजे. अर्थातच मग जयंतपाळाच्या राजेपणाविषयींच्या आख्यायिका केवळ दंतकथाच ठरतील.

३. वरील कालदर्शक ओवीबद्दलची महाराष्ट्र सारस्वतांतील पदटीपहि त्याचबरोबर लक्षांत घेतली पाहिजे. "शके १११० त साधारण संवत्सर पडत नाही; पण बार्हस्पत्य गणनेवरून पाहतां तो शके १११२ त पडतो." (पृ. ३७). म्हणजे काळाचा मेळ नाही.

४. महाराष्ट्र सारस्वतांत (पृ.३७) भावे म्हणतात : पुढें ग्रंथसमाप्तीचे वेळीं मुकुंदराज असेंहि सांगतो की 'नृसिंहाचा बल्लाळ। तेयाचा कुमरु जयंतपाळ। तेणें करविला हा रोळ। ग्रंथरचनेचा' पण ही ओवी ग्रंथसमाप्तीच्या वेळची नसून ती पूर्वार्धाच्या शेवटच्या सातव्या अध्यायांतील १५५ वी ओवी आहे (जगदीश्वर प्रेस, वि. कृ. आठल्ये, १९१३ आवृत्ति).

महाराष्ट्र सारस्वताच्या नव्या आवृत्तीच्या वेळीं पुरवणीलेखक प्रोफेसर डॉक्टर तुळपुळे यांनी भावे यांचा हा भोंगळपणा दुरुस्त करावयास पाहिजे होता. ही त्रयी बहुतेक पोथ्यांत सापडत असल्याने तिच्याबद्दल अधिक शोध झाला पाहिजे. " जैत्रपाळ जैनराजा असून तो कलचूरीचा मांडलिक होता हें इतिहासज्ञांस ठाऊक आहे," असें डॉ. तुळपुळे यांचें म्हणणें आहे; पण त्याला त्यांनी नेमका आधार दिलेला नाही. ही सबंध त्रयी जर इतिहासांत नमूद असलेली आढळली तर प्रश्नच मिटला; पण असल्या मोघम उल्लेखाने घोटाळा मात्र अधिक उत्पन्न होतो. जैन जैत्रपाळास हिंदु साधूचा शिष्य होण्यासाठी बरीच धार्मिक व सामाजिक बंडखोरी करावी लगेल. हा प्रश्न सोडून दिला तरी यासंबंधांत कै. चांदोरकरांचा 'श्रीशक १०३ चा ताम्रपट' हा लेख विचारांत घेण्यासारखा आहे. जैत्रपाळ, जैतपाळ, जयत्पाळ, व जयंतपाळ हीं नांवें अनेक ठिकाणीं सापडतील पण त्यांचा मुकुंदराजांशीं असलेला संबंध निश्चित करण्यास जयंतपाळ, बल्लाळ व नृसिंह या क्रमाने आलेले राजे सापडले पाहिजेत व त्यांचा स्पष्ट कालनिर्देश मिळाला पाहिजे. तसा तो अद्याप मिळालेला नाही.

५. मुकुंदराजाने आपल्या गुरुपरंपरेची माहिती विवेकसिंधूच्या उत्तरार्धातील ११ व्या अध्यायांत ओव्या ३४ ते ११४ मध्ये दिली आहे. त्यावरून पाहतां आदिनाथ–हरिनाथ–रघुनाथ व मुकुंदराज ही परंपरा नाथसंप्रदायांत तरी नवीन आहे. प्रसिद्ध मच्छिन्द्र–गोरक्ष वगैरेंशीं तिचा संबंध नाही हें आश्चर्यकारक आहे. म्हणून नाथसंप्रदायांतील या त्रयीचें स्थान निश्चित करणें अवश्य आहे.

६. वस्तुतः मुकुंदराजांनीच दिलेल्या तपशिलानुसार ' मनोहर अंबानगरी ' कोणती हें ठरवीत असतां मुकुंदराजांचा संबंध जोगाईच्या आंब्यास पोचतो एवढ्याच कारणास्तव तीच अंबानगरी होय असें जें डॉ. तुळपुळे म्हणतात तें बरोबर नाही. कारण या अंबानगरीस आपले परात्परगुरु हरिनाथ असल्याचें मुकुंदराज सांगतात, ही गोष्ट येथे लक्षांत घेतली जात नाही. मुकुंदराजांची समाधि जोगाईच्या आंब्यास जशी दाखवितां येईल तशीच ती नागपूर प्रांतीं खेंडळें येथे असल्याची परंपरागत माहिती आहे. शिवाय त्यांचे गुरु रघुनाथ यांची समाधि छिंदवाड्यास व हरिनाथांची अंभोऱ्यास आहे; आंबेजोगाई येथे नाही. यापेक्षाहि बलवत्तर प्रमाण म्हणजे या संप्रदायाचे मठ व अनुयायी अद्याप नागपूर प्रांतीं असून, त्यांच्या मठांतील कागदपत्र न तपासतां पोकळ शब्दपांडित्याने हा प्रश्न सुटण्यासारखा नाही.

७. मुकुंदराजांसंबंधीच्या आख्यायिकांचें मूलस्थान कोणतें त्याचें संशोधन झालें पाहिजे. श्री. ज. र. आजगावकरांनी ( म. क. च. भा. १ ) उद्धवसुतकृत ' रामदासचरित्र अथवा रामदासी कीर्तनसंग्रह ' या ओवीबद्ध ग्रंथांतील मुकुंदराजांच्या चरित्राचा भावार्थ देऊन जी आख्यायिका दिली आहे तिच्यांत जयत्पाळराजाने ब्राह्मणांस व साधूंना कारागृहवास व तळें खोदण्याची शिक्षा दिल्याचें म्हटलें आहे. पण म. सा. पुरवणींत डॉ. तुळपुळे त्यांस चक्की पिसण्याची किंवा हरभरे भरडण्याची शिक्षा सांगतात ( पृ. ८४५ ). परमामृताच्या प्रस्तावनेंत श्री. नारायण हरि भागवत "मुकुंदराजनामें अष्टवर्षांतक तेजःपुंज मूर्ति नारायणनामाचा गजर करीत जयत्पाळ राजाच्या नगराच्या वेशींत शिरली " असें वर्णितात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे घोड्यास व राजास एकच सपाटा लगावल्याने राजास ( व घोड्यास ? ) सात दिवस समाधि लागली. पांगारकरमतें राजा घोड्यावर बसल्यावर (?) मुकुंदराजांनी त्याच्या मस्तकावर हात ठेविला व तीन दिवस अहोरात्र तो समाधिस्थितींत होता. श्री. आजगावकरांना राजाला ती अवस्था प्राप्त करून द्यायला व घोड्याला मुक्ति द्यायला ५२ छड्या माराव्या लागल्या आहेत.

अशा रीतीने एका आख्यायिकेचा दुसरीशीं मेळ बसत नसल्याने या आख्यायिकांची कसून तपासणी झाली पाहिजे.

८. सारांश, अशा प्रश्नांत विवादस्थळें पुष्कळ असल्याने एखाद्या मुद्द्यावर एकदेशीय चर्चा न करतां व अपुऱ्या साधनांनी कोणताहि मुद्दा निकालांत काढण्याची घाई न करितां अधिक माहिती मिळण्याची वाट पाहणें किंवा ती मिळविण्याची खटपट करणें हेंच सध्याच्या परिस्थितींत योग्य ठरेल. म्हणून शाब्दिक वादांत न शिरतां नवीन उपलब्ध झालेल्या मुकुंदमुनींच्या गुह्यसप्तकाची माहिती मराठीच्या अभ्यासकांस करून देण्याचें योजिलें आहे.

९. श्रीमुकुंदमुनींचें "गुह्यसप्तक" ज्या बाडांत आढळलें त्याची थोडक्यांत प्रथम माहिती दिली पाहिजे. कातड्याने शिवलेलें हें बाड लहानसें म्हणजे ५·३" × ४" या आकाराचें असून त्यांत एकूण लिखितपत्रें ६३ आहेत. कागद जुना मुडाचा आहे. अक्षर आधुनिकी वळणाचें आहे. कालनिर्णयाचें साधन अंतर्गत पुराव्याखेरीज दुसरें नाही. या बाडांत लावण्या, पदें, अभंग, श्लोक वगैरे लहानमोठीं २८ प्रकरणें आहेत. तीं यथानुक्रम येणेंप्रमाणे:—

(१) मध्वनाथांची लावणी—'आद्भूत कैसा नवल तमासा गुरु दाखवि डोळां' (पत्रें ७½, कडवीं ४, प्रसिद्ध की अप्रसिद्ध शोध घेणें आहे.)

* (२) मुकुंदमुनींचें गुह्यसप्तक—(७ अभंग, चरणसंख्या ३०, पत्रें ८½, अप्रसिद्ध.)

(३) मध्वनाथांची लावणी—(२) -'बहुजन्माचे मुकित प्राण्या नरतनु सापडलि' पत्रें ८, कडवीं ४, शोध घेणें आहे.)

(४) मध्वनाथांची लावणी —(३)–' पाहा कसे रूप मनोहर दाखवि डोळां' (पत्रें १०, कडवीं ४, शोध घेणें आहे.)

(५) ज्ञानेश्वरांचा अभंग—(१)–' नवामाझारी। औट पीटाशेजारी शुन्याची वोवरी। सुनीळ प्रभा ( चरण ५ ).

* (६) तुकारामांचा अभंग—(१)-' जोतीचा प्रकाश। पाहीन तुझे पाय' (चरण ५, अप्रसिद्ध. सकलसंतगाथा-आवटे व सरकारी इन्दुप्रकाशगाथा, नवी आवृत्ति, यांत सापडत नाही.)

(७) ज्ञानेश्वरांचा अभंग—(२) 'कानीं घालुनिया बोटें नादानें पहावें' (चरण ५).

* (८) गहिनीनाथांचा अभंग—' सुन्यामाजीं सुन्य, त्यामाजी बीज' (चरण ३, अप्रसिद्ध)

* (९) ज्ञानदेवांचा अभंग—(३)' उर्ध्व करुनि ब्रह्माग्नि चेतवावा' (चरण २०, बहुधा पद असावें. अप्रसिद्ध).

(१०) तुकारामांचा अभंग (२)-'माया तेचि ब्रह्म, ब्रह्म तेचि माया'. (चरण ४).

* (११) केशवाचा अभंग--'मुद्रा लागली खेचरी' (चरण ५, केशवस्वामींच्या कवितेंत सापडला नाही.)

* (१२) भगाचा अंभंग (१) 'औट हाताचे हो तळि' (च. ९, अप्रसिद्ध).

* (१३) भगाचा अभंग (२)--'मुंगि माता यक तळ' (च. ६, अप्रसिद्ध).

* (१४) तुकारामांचा अभंग (३)—'मकाराच्या माथा, झळकति चांदनि' (च.४, अप्रसिद्ध).

* (१५) ज्ञानेश्वरांचा अभंग (४)—'अलक्ष आगोचर गोसावि' (च. ९, अप्रसिद्ध

(१६) ज्ञानदेवांचा अभंग (५)—'द्रष्टि माजी तेज लखलखित दोखिले' (च. ४)
(१७) सिवदिन वावा पैठणकर यांचें पद—'पांढऱ्यावरि काळ बोट' (कडवीं ४, शोध घेणें आहे).
* (१८) भगाचा अभंग (३)—'साहाचा संसार । वाढविला विस्तार' (च. ४, अप्रसिद्ध).
(१९) नाथनिरंजनाचा अभंग—' हरपली सता, च्यारि देह पाहतां ' ( च. ४, शोध घेणें आहे).
(२०) विष्णुदासनाम्याचा अभंग—'मायबाप दोघे जिवेची मारावे' (च. ४, शोध घेणें आहे).
(२१) मुक्तेश्वरांचा अभंग—'नाहीं घडलें मात्रागमन' (च. ४, शोध घेणें आहे).
* (२२) भगाचा अभंग (४)—'नाम अनाम देखणा' (च. ४, अप्रसिद्ध).
(२३) नाथनिरंजनाचा अभंग (२)—'तन मन धन, गुरुशि अर्पण' (च. ३, शोध घेणें आहे).
(२४) पूर्णानंदाचें पद—'तरिच जन्मा यावे । ते रूप पहावें' (कडवीं ४, शोध घेणें आहे).
* (२५) भगाचा अभंग (५)—'येकविस स्वर्गांचे पाटारी' (च. १०, अप्रसिद्ध).
(२६) तुकारामांचा अभंग (४)–' अनुहात ध्वनि, वाहे सर्वा पिंडी' (च. ५).
* (२७) सुत्रानाथाचा अभंग–' औट हाताचें घर ' (च. ४, अप्रसिद्ध).
(२८) अनामकविकृत श्लोक–' नसे स्वेत ना पित तारक काहिं'. (च. ४, शोध घेणें आहे ).

१०. हें सर्वच बाड महत्त्वाचें आहे हें वरील तपशिलावरून कळून येण्यासारखें आहे. संग्रहकाराच्या निवडीवरून लेखक कोणीतरी नाथसंप्रदायी असावा. कारण यांतील सर्वच प्रकरणें योगविषयक गूढगुंजनाच्या परिभाषेंत लिहिलेलीं आहेत. पैठणकरबाबा शिवदिन केसरी यांचा यांत उल्लेख असल्याने हें बाड १५० वर्षांपेक्षा जुनें नाही. मुकुंदमुनिकृत गुह्यसप्तका-खेरीज मुकुंदराजशिष्य भगवान् ऊर्फ भगा याचे ५ अभंग, गहिनीनाथ, सुत्रानाथ व केशव-स्वामी यांचे प्रत्येकी १।१ अभंग नवीन आहेत. त्याशिवाय ज्ञानेश्वर व तुकाराम यांचे २।२ अभंग प्रथमच उजेडांत येणारे आहेत. विद्यमान उपलब्ध प्रकरणाशीं तुलना करतां यांतील लेखन अशुद्ध असलें तरी यांतील पाठ कित्येक स्थळीं सरस असल्याचें आढळून आलें आहे.

११. प्रस्तुत आपणांस इतर गोष्टींशीं कर्तव्य नसून मुकुंदमुनिकृत ' गुह्यसप्तक ' या प्रकरणासंबंधाने थोडक्यांत चर्चा करावयाची आहे. ' गुह्यसप्तक ' हें एक लहानसें ७ अभंगा-त्मक प्रकरण आहे. ते अभंग असे :

१

जाणति कळा हरपोनि गेलि । द्रिष्टि मावळलि तयामाजि ॥१॥
पाहाता पाहणे हारपोनि गेले । मिमाजि आथिलें तयामाजि ॥२॥
रूपातित द्रिष्टि पाहाता आगोचर । पाहावा सादर जवळि आसे ॥३॥
द्रिष्टिविण पाहाणें शब्देविण वोलणे । मुकुंदमुनि म्हणे दातारे केले ॥४॥

४

२

सत्व रज तम हरपोनि गेले । द्रिशाचि लावाणि कैशि जालि ॥१॥
गेलीया माझारीं पाहाता न दिसे । स्वतंत्र प्रकाश सदोदीत ॥२॥
आंतरि बाहेरि पाहाता हे जरि । शुन्याचे वोवरी ग्रासियेली ॥३॥
ग्रासियले तेणे चंद्रसूर्य दोन्हि । मुकुंदाचे मणि आनंद जाला ॥४॥

३

जालेपण तेथे नाहि आपपर । परेंचे विवर देखोनियां ॥१॥
परेहि परते चौशुन्या वरते । शुन्य शब्द तेथें बोलो नये ॥ २ ॥
परतल्या श्रुति घोश आनुहातिं । वाद्यविण चित्ति आनंद जाला ॥ ३ ॥
आनंदा आनंद आवघा मुकुंद । नाहि भिन्न भेद दुजेपणे ॥ ४ ॥

४

द्रिष्टित हे गुज शुन्याचें सार । तेच दश्वे द्वार पाहे बापा ॥ १ ॥
कमळाआत जैसा आमोद आसे । वरि ते प्रकाशे पुष्प जैसे ॥ २ ॥
तेथे हा मधूकर नित्य आतां । सुक्ष्म पाहातां आति लिन ॥ ३ ॥
लीन होउनिया भुंगिचिये परि । जिंकावि वोवरि आति गाढा ॥ ४ ॥
म्हणे हा मुकुंद आवघा हा गोविंद । गोनाम शब्द लिन जेथें ॥ ५ ॥

५

शब्द सरला निशब्द जाला । कोठे मावळला साग रया ॥ १ ॥
नादेविण भेद भेंदेविण नांदं । वाद्याविण गजर कैसा जाला ॥ २ ॥
औटपिटाताळि सहश्रदळावरिं । तेथे यक मोहरि वाजिनलि ॥ ३ ॥
नवाहि खालतें दाहाव्या वरते । नादेश्वर तेथें प्रगटला ॥ ४ ॥
मन हा भुजंग भुलोनिया गेला । छंदे डउरला मुकुंदमुनि ॥ ५ ॥

६

जाणिवेचि हाव सरोनिया गे ठिलि । द्रिष्टि पुंजाळलि पाहाताचि ॥१॥
नाहि तोचि दिसे प्रकाश उदयाचा । रवि शशि त्याचा प्रकाशक ॥२॥
सगुण निर्गुण छाया माया नाहि । आलक्ष लक्षिता भुलले ते बाई ॥३॥
विश्रांति विश्राम पाहतांचि काय । मुकुंदाची सोय हारपलि ॥४॥

७

जाळि तरंगाकार नव्हे हा वेघळा । आसोनि निराळा तैसा तोचि ॥१॥
दुजेपण तैसे गेले हरपोनि । सागरिचे पाणि नव्हे जळधर ॥२॥
उस हे साखर नव्हे वेगळि । आमृताचि गोडी जाणे तोचि ॥३॥
तैसा दूजेपणा वीसर पडीला । स्वये विसरला मूकुंदमुनि ॥४॥

गुह्य सप्तक संपूर्ण.

१२. मुकुंदराज व जयत्पाळ यांची जी आख्यायिका श्री. आजगावकरांनी दिली आहे त्या आख्यायिकेंत राजाची समाधि उतरल्यानंतर "मुकुंदराजांनी जयत्पाळास खालील अभंग म्हणून आत्मज्ञानाची ओळख करून दिली" असें म्हटलें आहे. त्यांत गुह्यसप्तकांतील तीनच अभंग फेरफार करून दिलेले आढळतात. त्यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे :

( १ ) दृष्टीचें अग्र शून्याचें तें सार । तेंची दशमद्वार पाहीं बापा ॥१॥
तेथें मधुकर नित्य खेळें आतां । सूक्ष्म पाहतां अति लीन ॥२॥
लीन होउनियां भुंगिचीये परी । जिताचि ओंवरी ग्रासियेली ॥३॥
म्हणे मुकुंदराज अवघाचि गोविंद । गोनामें तो शब्द लीन तेथें ॥४॥

( २ ) सत्वरजतम गेलें निरसोनी । दृश्याची लावणी कैसी झाली ॥१॥
गेली गा माझारीं पाहतां न दिसे । स्वयें तें प्रकाशे सदोदित ॥२॥
आंत बाहेरीहीं पाहतांची जरी । शून्याची ओंवरी ग्रासियेली ॥३॥

( ३ ) जाणती हे कळा हारपोनी गेली । दृष्टी माझी वळली तयामाजी ॥१॥
रूपातीत दृष्टी पाहतां अगोचर । देखतां सादर जवळी असे ॥२॥
दृष्टींवीण पाहणें शब्देंवीण बोलणें । मुकुंदराज म्हणे ऐसें झालें ॥३॥

१३. या अभंगांची रचना पाहतां मुकुंदराजानें स्वतःचा अनुभव यांत ग्रथित केलेला आहे, उपदेशपर असें यांत कांही नाहीं. अर्थात्, वरील आख्यायिकेशीं जोडण्यांत आलेला या अभंगांचा संबंध बादरायण-स्वरूपाचाच असावा हें स्पष्ट दिसतें. यांतील गाळागाळी, अनुक्रमांतील बदल व पाठभेद हे आजगावकरांच्या संग्रहीं असलेल्या बाडांत मुळांतच तसे आहेत, की त्यांत सहेतुक फेरफार करण्यांत आला आहे तें समजण्यास मार्ग नाही. तें कसेंहि असो, वरील आख्यायिकेप्रमाणें हें ' गुह्यसप्तक ' विवेकसिंधुकर्त्या मुकुंदराजानेंच आहे असें म्हणणें क्रमप्राप्त ठरतें. तसेंच, मुकुंदराजांचीं म्हणून जीं पदें छापलेलीं आहेत त्यांच्याशीं तुलना करतां असली गूढगुञ्जनात्मक रचना मुकुंदराजांच्या बाबतींत संभवते. विशेषतः, ' अनेककविकृत पदसंग्रह, भाग १ ला ' यांतील " हे खुण अनुभवाची पिंडी परतोनी पाहे । आपेआप प्रकाशलें तेणें आनंदें राहे " या दुसऱ्या क्रमांकाच्या पदाची यांच्याशीं तुलना होण्यासारखी आहे. तथापि गुह्यसप्तकापेक्षा पदांची भाषा ही अधिक प्रौढ व सरस आहे आणि तिचें विवेकसिंधु व परमामृत यांच्याशीं साम्य दर्शवितां येईल. परंतु या सर्वांची अर्वाचीन पद्धतीची भाषा ही ज्ञानेश्वरांच्या पूर्वी शंभर वर्षें रूढ असलेली मराठीभाषा होय असें म्हणणें हास्यास्पद आहे.

१४. या ' गुह्यसप्तका 'मुळे मुकुंदराजांसंबंधी विशेष माहिती कळते असें म्हणतां येणार नाही. पण याच बाडांत भगाच्या नांवावर जे पांच अभंग आहेत ते महत्त्वाचे आहेत. कारण हा भगा ऊर्फ भगवान् स्वतःला मुकुंदराजांचा शिष्य म्हणवितो व गुह्यसप्तकाची व या अभंगांची तुलना केली तर त्याचें हें शिष्यत्व सहज मान्य करतां येईल. केवळ भाषा किंवा रचनापद्धति यावरून हा संबंध जोडण्यांत आला आहे असें नसून " औट हाताचे हो तर्ळी " या अभंगांत त्यानें 'मुकुंदराज दावी खुण । भगा वंदितो चरण' असें स्पष्ट म्हटलें आहे. सारांश, या बाडामुळे मुकुंदमुनींच्या 'गुह्यसप्तका' बरोबरच आपणांस त्याच्या भगवान् नामक शिष्याचे पांच अभंग नव्यानें उपलब्ध झाले आहेत.पण विवेकसिंधूप्रमाणेच 'गुह्यसप्तका'ची भाषाहि अर्वाचीन असल्याकारणानें मुकुंदराजांच्या कालासंबंधीं निर्णायक असा पुरावा अद्याप हातीं आला नाही, हें म्हटल्यावाचून गत्यंतर नाही. कदाचित् मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत जे ७।८ मुकुंद आढळतात त्यांच्या उपलब्ध वाङ्मयकृतींच्या सूक्ष्म अभ्यासानें यांवर अधिक प्रकाश पडूं शकेल.* ◆ ◆ ◆

---

* ' भारत इतिहास संशोधक मंडळा'च्या वार्षिकोत्सवप्रसंगीं वाचलेला निबंध.

# साहित्य-समीक्षा

## महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा विचार

आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास — विशेषतः राजकीय आणि सामाजिक विचारांचा इतिहास — हा अनेक विद्वानांच्या जिव्हाळ्याचा विषय झालेला आहे; आणि मराठी वाङ्मयाचें हें दालन आता ( विशेषतः जावडेकरांच्या 'आधुनिक भारता'च्या प्रकाशनानंतर ) चांगलें समृद्ध झालेलें आहे. अशा समृद्ध वाङ्मयांतहि प्रा. नलिनी पंडित यांच्या पुस्तकाने मोठी लक्षणीय भर टाकली आहे हें त्यांचें खरें यश होय. या यशाचें मर्म नलिनीबाईंच्या विस्तृत आणि विवेचक अभ्यासांत आहे, त्यांच्या निरलस साक्षेपांत आहे, त्यांच्या वैचारिक प्रामाणिकपणांत आहे, आणि त्यांनी धारण केलेल्या सैद्धान्तिक पण कांहीशा लवचीक दृष्टिकोनांत आहे.

सौ. पंडितांच्या अध्ययनाचा पुरावा अगदी पहिल्या प्रकरणांतच मिळतो; किंबहुना तें प्रकरण ( 'नव्या युगांतील नव्यां जाणिवा' ) हें माझ्या मतें साऱ्या पुस्तकांतलें सर्वोत्कृष्ट प्रकरण आहे. ( कदाचित् त्यांचा 'वैचारिक पिंड' पोसणारे प्रा. सरदार यांचें मार्गदर्शन या प्रकरणीं विशेष प्रभावी असेल. ) सौ. पंडितांच्या साक्षेपी अध्ययनाचें एकच उदाहरण देतों. ब्रिटिशांच्या राजवटींत हिंदुस्थानची पद्धतशीर आर्थिक लूट होत असल्याचें दादाभाई नवरोजी यांनी प्रथम ( १९ व्या शतकाच्या आठव्या दशकांत ) शास्त्रीय रीतीने सिद्ध केलें. त्यापूर्वी या लूटमारीची जाणीव अर्थातच होती. १८४८ सालीं प्रसिद्ध झालेल्या लोकहितवादींच्या शतपत्रांत तिचा भेदक उल्लेख आहे. पण त्यापूर्वी पांच वर्षें या विषयाचा शास्त्रीय विचार करणारा एखादा विद्वान् आणि तोहि महाराष्ट्रीय होता हें फारसें कोणाला माहीत नव्हतें. सौ. नलिनी पंडित यांनी रामकृष्ण विश्वनाथ यांच्या 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढे काय त्याचा परिणाम होणार, याविषयी विचार' या प्रबंधाचा शोध घेऊन प्रस्तुत लेखकाने 'राजकीय सत्ता, आर्थिक मक्तेदारी आणि यांत्रिक साधनें यांच्या जोरावर ब्रिटिशांनी आपली आर्थिक पिळवणूक चालविलेली आहे याची स्पष्ट जाणीव' महाराष्ट्राला दिली असें दाखवून दिलें आहे.

साक्षेपी अध्ययनामुळे सौ. पंडितांनी या पुस्तकांत अशा प्रकारच्या लेखनांत ज्या विषयांचा विचार विशेष कटाक्षाने करण्याची फारशी काळजी इतरांनी घेतलेली दिसत नाही अशा विषयांचा विचार केलेला आढळतो. उदाहरणार्थ, महाराष्ट्राच्या मानाने आधुनिक गुजरातची व्यापारी प्रगति कां झाली ( पृ. ९२-९३ ), लो. टिळकांचे अर्थशास्त्रीय विचार कसे व किती

---

महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा विचार—[ ले. : प्रा. नलिनी पंडित, प्रकाशक : नलिनी पंडित. वांबुळी–निवास, माहीम, मुंबई १६. किंमत ५ रु. ]

प्रतिगामी होते ( पृ. १००-१०२ ), महाराष्ट्रीय क्रांतिकारकांनी मॅझिनीची ' सशस्त्र बंडा ' ची शिकवण आत्मसात् करतांना त्यांचा जीवनविषयक मानवतावादी व जनताभिमुख दृष्टिकोन कसा दुर्लक्षिला ( पृ. ११३-११४ ), ' भाषिक, सांस्कृतिक, व राजकीय दृष्ट्या एकात्म असलेले महाराष्ट्रासारखे प्रादेशिक घटक हीं स्वतंत्र राष्ट्रकें आहेत असें मान्य केलें, तरी त्यांना राजकीय व आर्थिक सार्वभौमत्वाचे अधिकार मिळाले पाहिजेत असा आग्रह धरणें, कसें 'असमंजसपणाचें होईल ' ( पृ. २४४-२४५ ) वगैरे विवेचन पाहावें. अशा विवेचनामुळे अनेकांनी हाताळलेल्या या विषयाला कांहीं ठिकाणीं नवीनत्व प्राप्त झालेलें आहे. लेखिकेची शैलीसुद्धा जिला समर्पक म्हणतां येईल अशी असल्याने विवेचनाला कोठें अडथळा आल्यासारखें वाटत नाही. साक्षेपी वृत्तीमुळे लेखिकेने राष्ट्रवादाच्या वाङ्मयीन वगैरे आविष्काराचा विचार थोडासा का होईना केला आहे आणि त्यामुळे पुस्तकाला थोडेंसें व्यापक स्वरूप आलें आहे.

लेखिकेच्या विशिष्ट दृष्टिकोनामुळे या व्यापक पुस्तकांत एकात्मता येण्यास मदत झाली आहे. लेखिकेची दृष्टि जिला मार्क्सवादी ऐतिहासिक भौतिकतावादी दृष्टि म्हणतां येईल अशी आहे. लेखिकेच्या सौजन्यामुळे आणि प्रामाणिकपणामुळे तिचा सर्वत्र आग्रही आविष्कार झाला आहे असें वाटत नाही, पण विचाराची ही बैठक सुटणार नाही अशी विवंचना तिला लागलेली दिसते. महात्मा गांधींच्या कार्याचा विचार करतांना उदाहरणार्थ त्यांच्या कार्याचें यश आणि श्रेष्ठत्व यांच्याकडे डोळेझाक करण्याची तिची तयारी नाही; पण या विशिष्ट दृष्टिकोनामुळे, ' आर्थिक पिळणुकींतील अन्यायाचें त्यांना ( गांधींना ) आकलन झालें नाही' असें विधान करण्याचें धाडस ती करूं शकते. लेखिकेची ही दृष्टि प्रस्तुत पुस्तकांत तिला एकंदरीने उपयुक्त ठरलेली आहे. राष्ट्रवादाचा विचार हा बऱ्याच अंशीं राजकीय विचाराचा आणि घडामोडींचा विचार असतो. आधुनिक राष्ट्रवाद हा भांडवलशाही युगाचा मोठा विशेष आहे आणि मार्क्सचा ऐतिहासिक भौतिकवाद भांडवलशाहीच्या युगांतील घडामोडींचा अर्थ लावण्यास बराच उपयोगी पडतो. म्हणून महाराष्ट्रांतील आधुनिक राष्ट्रवादाचा इतिहास लिहितांना या वादाने एखादी जादूची कांडी हातांत आल्यासारखें एखाद्याला वाटलें तर तें क्षम्य आहे; पण त्या जोरावर लेखिका ज्या वेळीं महात्मा गांधींच्या नीतिविषयक कल्पनांना रद्द ठरवूं पाहते तेव्हा अपुरें ज्ञान उसळल्यासारखें वाटतें. लेखिकेने शिवकालीन राष्ट्रवादाचा विचार केला असता तर आपलें मार्क्सवादी शास्त्र बरेंच अपुरें पडतें असा अनुभव तिला आला असता. ( अर्थात् ठोकळेबाजी करण्याची तयारी असल्यास तोहि अनुभव येण्याचें कारण नाही हें श्री. लालजी पेंडसे यांच्या ' साहित्य आणि समाजजीवन ' ग्रंथाच्या वाचकांना ठाऊक आहेच; पण तशी ठोकळेबाजी करण्याची नलिनीबाईंना विशेषशी आवड असावी असें वाटत नाही. )

त्यांतली वस्तुस्थिति अशी आहे की, मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादांत, मानवी व्यवहारांतलें आर्थिक सत्य ग्रथित झालेले असलें ( आणि त्याच्याकडे समाजशास्त्रज्ञांचें लक्ष वेधण्यांत मार्क्सने फार थोर कामगिरी केलेली असली ) तरी तो सिद्धान्त मुळांतच दूषित ठरलेला आहे. उत्पादनासंबंधाच्या चौथऱ्यावर समाजाची राजकीय, सांस्कृतिक वगैरे इमारत उभी राहते, उत्पादनसाधनें व उत्पादनसंबंध यांचा निगडित परस्परसंबंध असतो आणि उत्पादनसंबंध आणि उत्पादनसाधनें यांच्यांत निर्णायक विग्रह निर्माण झाला म्हणजे क्रांतीस सुरवात होते, अशा अर्थाचा तो सिद्धान्त मार्क्सने A Contribution to the Critic of Political Economy च्या प्रस्तावनेंत प्रथम व्यवस्थित स्वरूपांत मांडला; पण तो मांडतांनाच मार्क्सने एक घोटाळा करून ठेवला आहे. समाजाची सांस्कृतिक इमारत उत्पादनसंबंधांनी deter-

mine होते की condition होते ? म्हणजे हा संबंध कार्यकारणस्वरूपाचा आहे की संभव-शक्यतेच्या स्वरूपाचा आहे ? मार्क्सने हे दोनहि शब्द वापरले आहेत. (हा भाषांतराचा घोटाळा नाही. मार्क्सने मूळ जर्मन भाषेतच दोनहि अर्थांचे शब्द वापरले आहेत. मार्क्स म्हणतो: "The mode of production of material life conditions (*bedingt*) the social, political and intellectual life process in general. It is not the consciousness of men that determines (*bestimmt*) their being, but, on the contrary, their social being that determines their consciousness.") पण या दोन शब्दांनी दोन निरनिराळीं समाजशास्त्रें सूचित होतात. अमुक अमुक अर्थरचना निर्माण झाल्याबरोबर अमुक अमुक तऱ्हेची सामाजिक – सांस्कृतिक इमारत तयार झालीच पाहिजे हें म्हणणें निराळें आणि तशी ती होण्याचा संभव अगर शक्यता निर्माण होते हें म्हणणें निराळें. Condition (संभव–शक्यता) चा दुसरा अर्थ घेतला तर अर्थरचनेच्या पायाबरोबर धर्म, सांस्कृतिक तयारी, नेतृत्व, बुद्धिमान् वर्गाची वृत्ति, चरित्र वगैरे इतर अनेक गोष्टींना महत्त्व प्राप्त होतें आणि तें निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या महत्त्वाचें ठरविलेलें दिसतें. मानवाची बुद्धि हा उत्पादक साधनांचाच भाग आहे असें म्हणून या पेचप्रसंगांतून सुटण्याचा प्रयत्न करण्यांत येतो, पण तो केवळ शब्दच्छलाचाच प्रकार म्हटलें पाहिजे; कारण एकदा मानवी बुद्धि, मानवी चरित्र वगैरे गोष्टींना मार्क्सवादी अर्थानें उत्पादन–साधनें असें म्हटलें म्हणजे साराच विचार संकीर्ण आणि गुंतागुंतीचा बनतो आणि ज्या पेचप्रसंगांतून सुटण्यासाठी हा खटाटोप सुरू केलेला असतो तो पेचप्रसंग निर्माण होतोच. म्हणून ऐतिहासिक घडामोडींचा अर्थ लावतांना मानवाचीं उत्पादनसाधनें आणि उत्पादनसंबंध यांना महत्त्व दिलें पाहिजे असा ढोबळ निष्कर्ष काढण्यापलीकडे मार्क्सच्या सिद्धांताचा चरक अधिक चालवूं पाहिलें तर त्यांत अनेक विषय पिळून निघाले तरी त्यांतून चोयऱ्याच जास्त निघण्याचा संभव !

वर म्हटल्याप्रमाणे राष्ट्रवादाचा अर्थ लावण्यास लेखिकेची मार्क्सवादी (उदार मार्क्सवादी) दृष्टि उपकारक ठरली असली तरी ती दृष्टि मुळांतच सदोष असल्यामुळे तिच्या विवेचनांत अनेक गमती आणि घोटाळे निर्माण झाले आहेत. आगरकरवाद महाराष्ट्रांत पराभूत कां झाला याविषयींचेंच लेखिकेचें निवेदन (पृ. ९१-९५) उदाहरणार्थ पाहावें. महाराष्ट्रांत व्यापारी क्रांति न झाल्यामुळे आगरकरांच्या बुद्धिवादाची आणि व्यक्तिवादाची पिछेहाट झाली अशी नलिनीबाईंची थोडक्यांत मीमांसा आहे. त्यासाठी रूसो, व्होल्टेर यांच्या युरोपच्या क्रान्तीचा दाखला देण्यास त्या अर्थात् विसरलेल्या नाहीत. पण युरोपच्या क्रांतींत ख्रिस्ती धर्माचा वांटा केवढा होता (विशेषतः प्रॉटेस्टण्ट पंथाचा) याचा उल्लेख करण्यास त्या अजिबात विसरल्या. (मार्क्सवादी दृष्टीस तो उल्लेख सोईचा नसावा !) व्यक्तीचें महत्त्व हें ख्रिस्ती धर्माचें एक महत्त्वाचें मूल्य आहे, आणि प्रॉटेस्टण्ट उठावाच्या कालांत त्याला धार आली होती. युरोपांतील व्यक्तिवादाच्या विजयांत या मूल्याचा जो वांटा होता तो विसरून कसें चालेल ? उलट, महाराष्ट्रांत हिंदुधर्माचा आणि हिंदु आचारविचारांचा जो प्रभाव होता तो आगरकरांच्या व्यक्तिवादास आणि ऐहिकवादास मारक ठरला. पण याचाहि उल्लेख लेखिकेने केलेला नाही. गुजराती लोक जैन धर्माच्या प्रभावामुळे शेती व मुलूखगिरी या दोनहि हिंसाप्रधान धंद्यांपासून परावृत्त झाले हें कांहींसें दूरान्वित विधान करणारी (पृ. ९२) लेखिका या ढोबळ गोष्टी कशा विसरली याचें नवल वाटतें. "स्पेन्सरचें शिष्यत्व पत्करूनहि जीवनकलहाच्या कल्पनेवर आगरकरांनी विशेष भर दिला नाही, याचें कारण येथील मध्यमवर्गीतील कर्तृत्वशक्तीचा अभाव हेंच होय" (पृ. ९४) असें वर्गीय विधान लेखिका करते तेव्हा तिच्या

मीमांसेच्या प्रकृतीबद्दल शंका निर्माण होणें अपरिहार्य ठरतें. येथे आगरकरांच्या व्यक्तिमत्त्वाला कांही महत्त्व आहे की नाही ? आगरकर स्पेन्सरप्रमाणेच मिलचेहि शिष्य होते आणि मिलच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि विचारांचा आगरकरांवर फार परिणाम झालेला होता. आगरकरांचा इतिहासमीमांसेचा जो उतारा लेखिकेने ७९ पृष्ठावर दिला आहे तो वाचला की, आगरकरांचीं भौतिकवादी मूल्यें किती उदात्त प्रकृतीचीं होतीं याची कल्पना येते. अशा व्यक्तीची जीवन-कलहाकडे पाहण्याची दृष्टि विशिष्ट असणार. दुसरें असें की, मध्यमवर्गातील कर्तृत्वशक्तीच्या तथाकथित अभावाचा विपरीत परिणाम आगरकरांच्या व्यक्तिमत्त्वावर झाला होता असें लेखिकेला म्हणावयाचें आहे काय ? आणि आगरकरांच्या कालीं महाराष्ट्रांतील मध्यमवर्गाच्या अंगीं कर्तृत्वशक्तीचा अभाव होता हेंहि एक अर्धसत्यच मानावें लागेल; कारण लवकरच महाराष्ट्रांत मध्यमवर्गाच्या राजकीय कर्तृत्वाचें जें तेजस्वी दर्शन घडलें त्याची पायाभरणी आगरकरांच्या कालीं ( आणि आगरकरादि पुरुषांच्या हातून ) होत होती, आणि ती मुख्यतः आर्थिक स्वरूपाची नव्हती. लेखिकेच्या संबंध विचारसरणीची उभारणी मार्क्सच्या अर्धसत्यात्मक इतिहासमीमांसेवर झालेली असल्याने या पुस्तकांत अशा अर्धसत्यांची पखरण सर्वत्र झालेली आढळावी हें साहजिकच आहे.

लेखिकेने आपली इतिहासमीमांसा पार्शी समाजाला लावली असती तर तिचा अपुरे-पणा तिच्या ध्यानांत आला असता. पार्शी समाजाबद्दल तिने असें लिहिलें आहे की, "पारशी विचारवंतांनी समाजसुधारणेकडे अधिक लक्ष दिलें. जुन्या समाजव्यवस्थेशीं ते कोणत्याहि प्रकारें जखडलेले नव्हते. शिवाय कर्तृत्व व पैसा यांच्या जोरावर समाजांत त्यांना वरीच मानमान्यता व वजन प्राप्त झालें होतें. म्हणून साहजिकच नव्या मूल्यांची तरफदारी करण्यांत त्यांनी पुढाकार घेतला. दादाभाई नौरोजी, नौरोजी फर्दुनजी प्रभृतींनी प्रथम सुधारणावादाचें स्वागत केलें." (पृ. ३९ ) आता या नौरोजी-द्वयांबद्दल हें विधान बरोबर आहे, पण सबंध पार्शी-जमातीबद्दल असें म्हणतां येईल काय ? किंबहुना पार्शी जमात ही सामाजिक सुधारणेच्या दृष्टीने मागासलेली आहे असाच एकंदरीने अनुभव नाही काय ? वस्तुतः पार्शी जमात ही नव्या भांडवलशाहींत मुरलेली. पार्शी स्त्री-पुरुषांनी नवें शिक्षण मनःपूत घेतलेलें. नव्या उत्पादनपद्धतींतच पार्शी स्त्रीपुरुष एकंदरीने वावरत असतात. असें असूनहि समाजसुधारणेच्या दृष्टीने ही जमात मागसलेली कां, अगर सनातनी वृत्तीची कां ? १९ व्या शतकांत पार्शी सुशिक्षितांनी ब्रिटिश सुधारणांचें आणि पद्धतीचें ज्या कारणास्तव स्वागत केलें तेंच कारण याच्या मुळाशीं आहे. पार्शी जमात ही कमालीची अल्पसंख्याक आहे. दुसरें म्हणजे भारतीयांच्या आश्रयास आलेली अशी ती आगंतुक अल्पसंख्याक जमात आहे, म्हणून ती नेहमीच राज्यकर्त्यांशीं जमवून घेण्यास तत्पर असते. प्रथम पार्श्यांनी गुजराती हिंदूंची भाषा व वेशभूषा स्वीकारली. येथे ब्रिटिश समर्थ ठरल्यावर ब्रिटिश भाषा, ब्रिटिश शिक्षण, ब्रिटिश रीतिरिवाज आणि ब्रिटिश वेशभूषा यांचा स्वीकार करण्यांत त्यांनीच पुढाकार घेतला. पण हें सारें वरवरचें. अंतर्यामीं या अल्पसंख्याक आगंतुक जमातीस स्वसंरक्षणाची चिंता लागलेली असते व म्हणून आपल्या पुराण्या धर्मभावना, धर्मसमजुती, रूढि यांना ती घट्ट चिकटून असते. राज्यकर्त्यांच्या वेशभूषादि गोष्टींचा स्वीकार ही त्या जमातीची बहिर्गत संरक्षण-योजना ( Outer defence ) असते आणि स्वतःच्या पुराण चालीरीतीस घट्ट चिकटून राहणें ही अंतर्गत संरक्षण-योजना ( Inner defence ) असते. मार्क्सवादी इतिहासमीमांसेच्या सरळसोट आधाराने याचा अर्थ लागणार नाही.

कदाचित् मार्क्सवादी दृष्टिकोनाच्या आग्रहामुळे असेल, पण महात्मा गांधींचें कार्य आणि सिद्धान्त यांचा पुरेसा अर्थ लावणें लेखिकेला जमलेलें नाही. मार्क्सवादी दृष्टीमुळे गांधींचे सिद्धान्त पटत नाहीत. पण अंगभूत प्रामाणिकपणामुळे गांधींचें विशाल व्यक्तित्व आणि कार्य नाकारतांहि येत नाही, अशी मोठी कुचंबलेली अवस्था लेखिकेची झालेली आहे. ( गांधींची स्तुति आणि त्यांच्यावर टीका करणारे परिच्छेद शेजारीं शेजारीं ठेवून पाहावें म्हणजे मी काय म्हणतों याची प्रचीती येईल. एकाच लेखणींतून ते उतरले आहेत काय असा संभ्रम होण्याइतका त्यांत विसंवाद आहे. ). त्याचें असें झालेलें दिसते की, मार्क्सवादी चष्मा चढविल्यामुळे गांधींच्या विचारांत आधुनिक असें फारसें कांही लेखिकेला दिसतच नाही. उदाहरणार्थ, विकेंद्रीकरणाला गांधींच्या विचारांत फार मोठें स्थान आहे आणि विकेंद्रीकरणाचा पुस्तकांत उल्लेखच नाही. विकेंद्रीकरण हा एक फार आधुनिक विचार आहे आणि ती फार मोठी आधुनिक गरज आहे, हें बर्ट्रान्ड रसेलच्या Science of Society याचारखें एकादें पुस्तक वाचल्याने सहज ध्यानांत येईल. महात्मा गांधींनी सत्याग्रह आणि सत्तापराङ्मुख सेवकवर्ग या कल्पनांच्या द्वारे लोकशाहीच्या शास्त्रांत जी भर टाकलेली आहे तिचीहि लेखिकेला जाणीव दिसत नाही. विकेंद्रीकरण आणि लोकशाहीत घातलेली ही भर यांचा विचार केल्याशिवाय गांधींच्या कार्याचें मूल्यमापन करूं पाहणें हें मोठें धाडसाचें काम होय !

कां नकळे, पण लोकहितवादी, न्या. रानडे, नामदार गोखले इत्यादि 'नेमस्तां'बद्दल मोठ्या उदार बुद्धीने, अभ्यासू वृत्तीने आणि व्यापक दृष्टीने लिहूनसुद्धा लेखिकेला त्यांच्या कार्याचें एक प्रमुख सूत्र हस्तगत झालें नाही, याचें मोठें नवल वाटतें. ब्रिटिश राजकर्त्यांच्या न्यायबुद्धीबद्दल आणि ब्रिटिश राज्याच्या प्रगतिपर वृत्तीबद्दल विश्वास असल्यामुळे रानडेप्रभृतींनी राजनिष्ठा हा आपल्या राजकारणाचा प्रमुख भाग केला असें लेखिकेनें म्हटलें आहे. ( रानड्यांच्या बाबतींत तिने त्यांच्या मनावरील प्राचीन संस्कारांचाहि आवर्जून उल्लेख केला आहे. ) पण या मंडळींच्या राजकीय व सामाजिक धोरणाच्या मुळाशीं ईश्वरी योगायोगाचा जो सिद्धान्त होता त्याचा अजिबात विचार या पुस्तकांत झालेला नाही. हिंदुस्थानचा आणि हिंदी लोकांचा ब्रिटिशांशीं संबंध परमेश्वरी प्रेरणेने हिंदी लोकांच्या कल्याणासाठीच घडून आला आहे आणि तो तोडण्याचा प्रयत्न करणें हा ईश्वराविरुद्ध गुन्हा आहे अशी या मंडळींची श्रद्धा होती. मग भारतीयांचें कर्तव्य काय, तर स्वतःचा सामाजिक व राजकीय उद्धार करून घेऊन या ईश्वर-प्रणीत संबंधास पात्र बनणें आणि म्हणूनच या मंडळींच्या विचारवंत समाजसुधारणेस फार महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें. 'नेमस्तां'ची ही श्रद्धा होती व तिचा उल्लेख नामदार गोखल्यांच्या भारतसेवक समाजाच्या प्रतिज्ञापत्रकांत आढळतो. टिळक आणि आगरकर यांनी या ईश्वरी योगायोगाच्या तत्त्वज्ञानावर कडाक्याचा हल्ला केलेला होता आणि महाराष्ट्राच्या राजकीय विचाराच्या इतिहासांत याचा उल्लेख येणें अवश्य होतें; किंबहुना या ईश्वरी योगायोगाच्या तत्त्वज्ञानाची जाणीव राखून लेखिकेने लिहिलें असतें तर परिच्छेदच्या परिच्छेद निराळे ठरले असते.

या ग्रंथांत मला जो एक मोठा अपुरेपणा दिसला तो 'संयुक्त महाराष्ट्रविषयक' विचाराचा. या विषयाचा विचारच या पुस्तकांत नाही. पण राष्ट्रवादाशीं त्याचा संबंध फार निकटचा आहे. बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर वगैरे ठिकाणीं असलेल्या महाराष्ट्रियांचा उल्लेख

('fellow countrymen') सार्वजनिक सभेंत मल्हारराव गायकवाड प्रकरणीं केलेल्या अर्जांत आढळतो. भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाचा स्थूल विचार पुस्तकांत झालेला आहेहि. म्हणून संयुक्त महाराष्ट्रवादाचा विशेष विचार या पुस्तकांत अवश्य होता. १९४७ नंतरच्या घडामोडींचा विचार आपण केला नसल्याचें लेखिका प्रस्तावनेंत म्हणते. त्यामुळे हा विचार झाला नसेल; पण १९४७ नंतरच विकसित झालेल्या नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणाचा साक्षेपानें विचार होतो तर या अत्यंत निगडित विषयाचा कां होऊं नये ? ◆ ◆ ◆

प्रभाकर पाध्ये

## वाङ्मय-विमर्श

प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या संकलित लेखांचा हा तिसरा संग्रह. प्रदीर्घ व्यासंग, पद्धतशीर संशोधन व चिकित्सक दृष्टीचें समतोल विवेचन हे प्रा. बनहट्टींचे विशेष होत. त्यांचे हे विशेष त्यांच्या याहि लेखसंग्रहांत दिसून येतात.

मालाकार चिपळूणकरांच्या लेखनाचा परिणाम त्यांच्यावर झाला असून त्यांचें स्फूर्तिस्थान निबंधमाला आहे. कारण एके ठिकाणीं ते म्हणतात, "निबंधमालेने प्रभावित केलेल्या अवस्थेतून माझें मन पुढ पुष्कळच वाढलें व सार-असार पारखण्याचा विवेक करूं लागलें... तथापि चिपळूणकरांच्या लेखांनी त्याजवर केलेला परिणाम कधींहि पुसून जाणार नाही. त्यांनी माझ्या भावनांना जें वळण व उत्तेजन दिलें, त्यांतील संदेश कायमच आहे व राहील." (युगवाणी, मार्च १९४६). प्रखर ध्येयवाद, विचारांचें गांभीर्य व डौलदार भाषापद्धति हे चिपळूणकरी लेखनाचे अंगभूत गुण आहेत. महाराष्ट्रवार्णांच्या पर्तांचे हे संस्कार प्रा. बनहट्टींच्या लेखनांत आढळतात. फरक इतकाच की, 'आधुनिक मराठी वाङ्मयाची पाठशुद्धि' यासारख्या कांहीं लेखांत ते स्पष्ट दिसतात तर 'अनिष्ट वाङ्मयाच्या उत्पत्तीची कारणमीमांसा' यासारख्या कांहीं लेखांत ते अस्पष्ट दिसतात. एवढें मात्र खरें की, निबंधमालेच्या या संस्कारांतून प्रा. बनहट्टींची एक स्वतंत्र लेखनमूस तयार झाली आहे.

प्रस्तुत संग्रहांत एकूण आठ लेख आहेत. त्यांपैकी 'मराठी संतवाङ्मय आणि वैष्णव संप्रदाय', 'आधुनिक मराठी वाङ्मयाची पाठशुद्धि' व 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास' हे लेख संशोधनात्मक असून 'अनिष्ट वाङ्मयाच्या उत्पत्तीची कारणमीमांसा', 'साहित्याचें सर्वांगीण स्वरूप', 'संपादणी व छाननी' आणि 'वाङ्मयनिर्मितीची प्रेरणा' हे लेख चर्चात्मक आहेत व 'महाराष्ट्राचें पहिलें अमृतमधुर प्रेमकाव्य' हा शेवटचा लेख रसग्रहणात्मक आहे.

'मराठी संतवाङ्मय आणि वैष्णव संप्रदाय' या लेखांत प्रा. बनहट्टींनी संतवाङ्मयाच्या कांहीं अज्ञात वैशिष्ट्यांचें दर्शन घडविलें आहे. संतवाङ्मय हें पक्षभेदातीत असून त्यांत विचारभिन्नता कोठेहि आढळत नाही. आविष्कार-पद्धतीचें त्यांत वैचित्र्य आढळलें तरी त्यांतील विचाराचा गाभा मात्र एकच अशी त्याची विचारसरणी आहे. त्यांच्या मतें वारकरी पंथ व

वाङ्मय-विमर्श-प्रा. बनहट्टी लेखसंग्रह : [ मुद्रक व प्रकाशक : चित्रशाळा प्रेस, पुणें २. मूल्य ३॥ रु.]

समर्थसंप्रदाय यांच्यांत आपाततः दिसणारा विरोध हा खरा नसून भक्तिमार्गी संतांच्या वाङ्मयाप्रमाणेच रामदासी वाङ्मयाचें स्वरूप आहे. तसेंच संत हे कोणत्याहि पूर्वपरंपरेचे अनुयायी नाहीत. सोज्ज्वळपणा, विवादविमुखता आणि कोणत्याहि आचार्यप्रोक्त वेदान्तमताचें अनुयायित्व न पत्करतां स्वयंस्फूर्त, स्वतःच्या समाजाला हितकर अशा प्रेममय तत्त्वांचें प्रतिपादन हे महाराष्ट्रांतल्या भागवती संप्रदायाच्या वाङ्मयांचे वनहट्टींनी सिद्ध केलेले गुण मान्य होण्यासारखे आहेत. आमचें संतवाङ्मय हें शंकराचार्यांच्या अद्वैताचें संपूर्ण अनुकरण आहे या अपसमजाचें निराकरण त्यांच्या उपर्युक्त बुद्धिनिष्ठ सिद्धांताने होऊं शकेल.

'आमचे कवि अद्वैती विचारसरणीच्या कक्षेखाली ( Sphere of influence ) आले असले तरी ते तिचे अनुयायी व अंकित बनलेले नव्हते; ' ( पृ. २५ ) हें त्यांचें विधान मात्र विवाद्य वाटतें. कारण संतांचे विचार हे भक्तिमार्गी असले तरी त्यांचें ध्येय अद्वैतच होतें. सामान्य जनांसाठी त्यांनी भक्तिमार्गाचा पुरस्कार केला हें विसरतां येणार नाही. लोकसंग्रह करण्यासाठी त्यांनी स्वतःच्या मताला मुरड घातली होती. या दृष्टीने पाहतां ' आतां असो हें बोलणें । अधिकारासारिखें घेणें । परंतु अभिमान त्यागणें । हें उत्तमोत्तम ॥' दासबोध १–१–२६ ही समर्थांची भूमिका सर्व संतांची प्रातिनिधिक आहे. भक्तीचा अहर्निश डिंडिमघोष करणारा तुकाराम ' तुका म्हणे आळी । जेवीं नुरेचि वेगळी ॥ ' असे जेव्हा उद्गार काढतो तेव्हा ते अद्वैताचेच निदर्शक नाहीत का ?

तंत्रदृष्ट्या संतांच्या या अद्वैताचा शंकराचार्यांच्या अद्वैतवादाशीं व मायावादाशीं मेळ बसूं शकत नसेल पण तेवढ्यावरून संत अद्वैती नव्हते असा निष्कर्ष काढणें योग्य होणार नाही. अद्वैताच्या ध्येयासाठी सहजसाध्य अशा भक्तिमार्गाचा संतांनी आश्रय घेतला हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय. या दृष्टीने पाहतां 'मराठी वाङ्मय संस्कृत आध्यात्मिक ग्रंथकारांच्या परंपरेंतील आहे ' ( महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण, पृ. ११ ) हें ज्ञानकोशकार डॉ. केतकरांचें मत पटण्यासारखें आहे.

' आधुनिक मराठी वाङ्मयाची पाठशुद्धि ' या संशोधनपर निबंधांत वनहट्टींनी पाठशुद्धीचें महत्त्व सोदाहरण प्रस्थापित केलें आहे. वाङ्मयास्वादनासाठी पाठसंशोधनाची गरज असते हें त्यांचें मत कोण नाकारील ? वाङ्मयाचें आस्वादन हेंच समाजाचें मन सुसंस्कृत करील हा मुद्दा मान्य व्हावा.

' ज्ञानेश्वरीचा अभ्यास.' या लेखांत प्रा. वनहट्टींची ज्ञानपिपासु संशोधक वृत्ति दिसून येते. ज्ञानेश्वरीसारख्या अभिजात वाङ्मयाच्या अभ्याससंबंधीं यांत अचूक मार्गदर्शन केलें आहे. या संदर्भांत त्यांनी पद्धतशीरपणा ( method ), बिनचूकपणा ( accuracy ) आणि धिमेपणा, कष्टाळूपणा ( patience ) या तीन महत्त्वाच्या गुणांची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. ज्ञानेश्वरीचा अभ्यास हा कोणत्याहि एका प्रकारचा नसून पाठचिकित्सा, भाषाशास्त्र, अर्थलापनिका, मुळाशीं तुलना, पांक्त ( textual ), ऐतिहासिक, सामाजिक, ज्ञानेश्वरी व महाराष्ट्रीय भागवतधर्म इत्यादि अनेक दृष्टींनी या ग्रंथाचा अभ्यास करतां येण्यासारखा आहे याचा ऊहापोह अत्यंत मुद्देसूद पद्धतीने ते करतात. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची त्यांनी ही एक नवी दिशा दाखविली आहे.

' अनिष्ट वाङ्मयाच्या उत्पत्तीची कारणमीमांसा ' या निबंधांत समाजस्थितींतील होणाऱ्या फरकामुळे आजचें वाङ्मय हलक्या प्रतीचें झालें आहे हें त्यांनी ऐतिहासिक दृष्ट्या सिद्ध केलें आहे. इतकेंच नव्हे तर, त्यापासून परावृत्त होणें हें कसें आवश्यक आहे हें दाखवून

सर्व समाजाची एकतानता जेव्हा एखाद्या महत्कार्याच्या प्रेरणेमुळे निर्माण होईल तेव्हाच अशा वाङ्मयाची निर्मिति थांबेल हा त्यांचा निष्कर्ष चिन्त्य होय.

'साहित्याचें सर्वांगीण स्वरूप ' या इंदूर येथील अध्यक्षीय भाषणांत संस्कृति, ललितकला व साहित्य, मुसलमानाचें महाराष्ट्राशीं तादात्म्य, आधुनिक काव्यापासून अपेक्षा, कीर्तनसंस्थेचें पुनरुज्जीवन, सध्याच्या गायनपद्धतींतील सुधारणा, नीति व कलोपासना इत्यादि विविध विषयांची चर्चा आहे व या चर्चेच्या अनुषंगानें ललितेतर वाङ्मयाचा अभ्यास कलादृष्ट्या व सौंदर्य-दृष्ट्या कसा झाला पाहिजे यांचें सुंदर विवेचन त्यांत त्यांनी केलें आहे. तंत्रापेक्षा मंत्राचीच योग्यता अधिक आहे हा निष्कर्षहि सिद्धान्तप्राय म्हणावयास हरकत नाही.

' संपादणी व छाननी ' या स्फुटांत साहित्यांतील सर्वश्रेष्ठ ग्रंथाचें श्रेष्ठत्व त्यांतील अंत-र्मुख वृत्तीवर व मानसिक विश्लेषणावर अवलंबून असतें हा त्यांचा दृष्टिकोन आहे. या दोहोंच्या मनोहर संगमामुळे वाङ्मयांतील खऱ्या सौंदर्याचा व सत्याचा साक्षात्कार होतो या त्रिकाला-बाधित तत्त्वावर त्यांनी नेमकें बोट ठेवलें आहे. वाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टि रहस्योद्ग्राही हवी हें त्यांचें मत वादातीत आहे.

' वाङ्मयनिर्मितीची प्रेरणा ' या विदर्भ साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत मार्क्सवाद किंवा ऐतिहासिक भौतिक वाद, विकासवाद मनोगाहनवाद इत्यादि सांप्रदायिक विचारप्रणालींच्या आधारें साहित्याची मूलगामी चिकित्सा केली आहे. यांत 'साहित्याचें विवेचन मुख्यतया सहृदयलक्षी असावें. सहृदय वाचकांना होणारा परिणाम प्रत्यक्ष अनुभवगम्य असतो ......याच्या उलट लेखकलक्षी विवेचन कितीहि मार्मिक व सूचक असलें तरी तें प्रत्ययोत्पादक होत नाही' (पृ. १७८ ) असें लेखक म्हणतात. साहित्यविवेचन हें अमुकच प्रकारानें असावें असा आग्रह धरणें योग्य होणार नाही. कारण साहित्याच्या स्वरूपावर तें अवलंबून आहे. आत्म-निष्ठ वाङ्मयांत लेखकलक्षी विवेचन उपयुक्त ठरणार नाही का ? Reading is fruitful only when the reader shares the creative experience with the author हें सूत्र साहित्यविवेचनाच्या दृष्टीने महत्त्वाचें मानलें पाहिजे.

' महाराष्ट्राचें पहिलें अमृतमधुर प्रेमकाव्य ' हें प्राकृत वाङ्मयांतील गाथासप्तशती या सुप्रसिद्ध काव्याचें रसग्रहण होय. यांत लेखकाची अभिजात रसिकता प्रत्ययास येते. हें रसग्रहण केवळ वाङ्मयीन स्वरूपाचें नसून त्यांत ऐतिहासिक दृष्टीहि दिसते. लेखकाने यांत वेचक सौंदर्यस्थळांच्या द्वारा या प्रेमकाव्याच्या माधुर्याचा आस्वाद मराठी वाचकांस घडवून एका जुन्या पण उपेक्षित काव्याचा परिचय करून दिला आहे.

प्रा. वनहट्टींच्या लेखनस्फूर्तीचा उगम चिपळूणकरांच्या निबंधमालेंत असला तरी त्यांचें लेखन हें स्वतंत्र पण वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांची प्रकृति प्रदानतत्पर ( expressive ) नसून आदानतत्पर ( receptive ) असली तरी तिची रसिकता अभिजात असल्याचें येथे स्पष्ट दिसतें. लेखकाच्या शैलींत फारशी कलाकुसर नसली अगर कलात्मक आटोपशीरपणाचा अभाव त्यांच्या लेखनशैलींत आढळून येत असला तरी त्यांच्या विचारांची बैठक मात्र भक्कम आहे. कोणताहि विषय असो, त्याची चर्चा करतांना त्यांच्या अंतर्मुख वृत्तींतून स्फुरलेले विचारच प्रभावी होतात. या विचारांना त्यांच्या व्यासंगाचें भरपूर पाठबळ मिळतें. मौज अशी कीं, अभ्यासू वृत्ति व स्वतंत्र विचारशक्ति यांची पर्यंतच येथे लागलेली दिसते. या दोहोंचें आपलया परीने महत्त्व असून त्यांचा परस्परपूरकपणा त्यांत प्रभावीपणें व्यक्त

झाला असल्यामुळे प्रस्तुत लेखसंग्रह नजरेंत भरतो. विचारांचा सूक्ष्मपणा, सुबोध मांडणी आणि समतोल विधानें या त्रयीमुळे या लेखनसंग्रहाचें महत्त्व विशेष आहे.

प्रस्तुत लेखसंग्रहांतील विषय हे सार्वकालीन असल्यामुळे केवळ विषयाच्या दृष्टीने पाहतां हा लेखसंग्रह स्थायी स्वरूपाचा आहे. वनहट्टींचें संस्कारक्षम मन या लेखनसंग्रहांतील प्रत्येक लेखांत परिणत स्वरूपांत दिसतें. वाचकांच्या साध्याभोळ्या मनोभावनांना इष्ट वळण लावण्याचें सामर्थ्य त्यांच्या या लेखसंग्रहांत आहे हें निश्चित. ◆ ◆ ◆

र. वि. हेरवाडकर

## बनगरवाडी

श्री. व्यंकटेश माडगूळकरांची 'बनगरवाडी' ही धनगरांच्या जीविताविषयीची आणि त्यांच्या वस्तीचें चित्र रेखाटणारी कादंबरी आहे, असें म्हटल्याने तिचें सांगोपांग तर नव्हेच, पण अंशतः देखील वर्णन होणार नाही. कारण ही कादंबरी म्हणजे आणखी 'पुष्कळच' आहे. मानवाचें दुःख, त्याची अगतिकता, त्याचें स्थाणुत्व, त्यांतून त्याने आपल्यापुरती केलेली स्थितिप्रिय तडजोड, दुःख गिळण्याची मानवाची अपार ताकद, अशा किती तरी जिव्हाळी लागणाऱ्या गोष्टींचें एक अद्भुत रसायन या कादंबरींत झालेलें आहे. या रसायनांत बनगरवाडींतलीं माणसें पडतात, सुखावतात, दुखावतात, धडपडतात, कळंजतात, उठतात आणि पुन्हा कामाला लागतात. कधी कधी असें वाटतें की, हीं कसलीं माणसें ! यांना कांही जिद्द नाही. उभारी नाही. त्वेष नाही. बाह्य जगाची ओळख नाही.–कांही अंशीं खरें आहे हें. पण तरी तीं 'माणसें' आहेत; आणि त्यांच्या जीवितांत सुखदुःखांचा, हर्षविषादाचा, वऱ्यावाइटाचा, थोरक्षुद्रपणाचा, अहंकाराचा आणि लाचारपणाचा, व्यावहारिकपणाचा आणि भाकड समजुतींचा असा कांही चमत्कारिक कडूगोड काला झाला आहे की, त्यामुळे तीं जिवंत वाटतात. सकस वाटतात. हवींतशीं वाटतात. आपल्याशीं तीं एकरूप होतात आणि आपणहि त्यांच्याशीं सहकंप पावतों.

तसें म्हटलें तर 'बनगरवाडी'ला रूढ अर्थाने 'कथानक' नाही,–आपल्या जीवनाला नाही त्याचप्रमाणे. पण तींत व्यक्त झालेल्या धनगरांच्या वासना आणि त्यांचीं दुःखें यांनी कथानकाला आकार आल्यासारखा भासतो. खरा आकार आहे तो तींतल्या धनगरांना आणि रामोशांना. गावगुंड आणि उफराटा दादू बालट्या, प्रेमळ कारभारी, मधासारखा गोड आणि कुत्र्यासारखा इमानी आयबू मुलाणी, टोळासारखा जगणारा आनंदा रामोशी, सगळ्या गावाची वाळ पडल्यावरहि हट्टीपणाने वागणारा एकांडा बाळा बनगर, बावळट शेकू, त्याची हट्टी बायको, चवचाल आणि थिल्लर अंजी, भरकटणारा आणि फरपट निघालेला जगन्या, सगळी वाडी ओस पडली तरी आपल्या दोन मेंढरांनिशी घोरपडीसारखा तिथेच चिकटलेला म्हातारा काकुबा,–अशीं कितीतरी माणसें आपल्या मनापुढे तडक उभीं राहतात.

या माणसांच्या आपापसांतील संबंधांपेक्षा त्यांच्यापैकी प्रत्येकाचा शाळामास्तर राजारामाशीं जो संबंध आलेला आहे, त्याचमुळे त्यांचीं मनें आपल्याला दिसतात. आपसांतल्या

---

बनगरवाडी [ले. : व्यंकटेश माडगूळकर, प्र. : मौज प्रकाशन, मुंबई ४, मूल्य २॥ रु. ].

विशिष्ट कालावधीमधल्या संबंधांनी कथानक किंवा संविधानक तयार झालें असतें. त्याला तर येथें अवसर नाही; आणि राजाराम हीहि कांही सूत्रभूत व्यक्ति नाही. एकेका व्यक्तीच्या तोंडावर टॉर्चचा उजेड पाडावा आणि तिला न्याहळून घ्यावें, तशी स्थिति सर्वभर आहे. यामुळे सर्व कादंबरीला असा एक आकार म्हणून आलेला नाही,—शेवटें न गाठविलेल्या सणंगासारखा. एखादे वेळीं राजाराम कांही व्यक्तींना साहाय्य करितो किंवा एखादी योजना सुरू करून बनगरवाडींत धमाल उडवून देतो. असें झालें तरी त्यांत त्याच्या व्यक्तित्वाचे खास असे धागे दिसत नाहीत, की बनगरवाडींतला त्याचा अलिप्तपणा लपत नाही. त्याच्या निमित्ताने इतरांच्या मात्र जीवितांचें रूप दिसतें; आणि खरें म्हणजे तेंच महत्त्वाचें आहे. पण 'बनगरवाडी 'तील कोणत्याच व्यक्तीचा 'विकास '—जीविताच्या प्रवाहांतून झालेला 'विकास '—आढळत नाही. त्या व्यक्ति स्थिर आहेत. माडगूळकरांना व्यक्तित्वाच्या 'विकासा 'कडे लक्ष देण्याची फारशी ओढ वाटत नाही. ते फक्त व्यक्ति आपल्यापुढे नेटकी उभी करितात. तिच्या व्यक्तित्वाचा धागान् धागा पिंजून दाखवितात. त्या धाग्यांतल्या रंगाच्या छटान् छटा उघड करतात. पण झाड वाढावें तशी ती व्यक्ति वाढतांना दिसत नाही. ज्या मातींत ती जन्मली तिचें रंग–रूप, कस–हीण ती घेते, पण ती व्यक्ति प्रथम भेटते, जवळजवळ तशीच ती कादंबरीच्या अखेरीसहि दिसते. कादंबरीच्या शेवटीं दुष्काळाने वाडी ओस पडते, आणि सगळीं माणसें देशोधडीला लागतात, असा भाग आहे. आपल्याला खात्री असते की, पुन्हा हीं सारीं चिकट माणसें पुढच्या मृगाला याच वाडींत येणार आणि पुस्ती काढल्याप्रमाणे तेंच जीवन तसेंच कंठूं लागणार. व्यक्तित्वाचा विकास न दाखविण्याला हें कारण असूं शकेल. कारण ज्याचें अस्तित्वच मुळी जवळजवळ शिळारूप झालें आहे, त्याचा विकास तरी कुठला ? हें जमेला धरिलें तर व्यक्तिविकासाचा अभाव ही माडगूळकरांची कलामर्यादा वाटत नाही. निदान येथे ती बोचत नाही खास.

माडगूळकरांचें हें व्यक्तिदर्शन इतकें परिपूर्ण असतें की, त्या व्यक्तींचीं कृत्यें अगदी सहज,—वेलीला फूल यावें, किंवा पांखराला पर फुटावे, तितकीं सहज उलगडत जातात. या दृष्टीने त्यांनी निर्माण केलेल्या व्यक्ति अगदी सरळ, साध्या दिसतात. मात्र त्यांच्या दुःखाने आपण हवालदिल झाल्यावाचून राहत नाही. त्यांचें दुःख आक्रस्ताळें मुळीच नसतें. त्या दुःखाचा तोलहि सुटत नाही; उलट, तें अबोल असतें. इतकेंच नव्हे तर, कधीकधी व्यक्तीला त्याची जाणीवहि नसते. पाथरवटाने शिळा फोडल्यावर तिच्या अंतर्भागांतून एकाएकी बेडकी बाहेर पडावी त्याप्रमाणे हें जिवंत दुःख वरवर शिळारूप वाटणाऱ्या व्यक्तीच्या मनांत आक्रंदत असतें. याचमुळे अशा दुःखाची होणारी जाणीव पराकाष्ठेची चरचरीत वाटते. त्यांच्या व्यक्तींच्या वासना बेफाम असतात. दांतावर मारायला कवडी नसली तरी बेलगाम जगन्या खुशाल लोकांची बायको काढून आणतो. कारभाऱ्याने मरतांना मोठ्या विश्वासाने आपली पोर अंजू, शेकूपाशी संभाळावयाला दिली तरी तो तिच्याचभोवती फिरत राहतो आणि अंजू तरी कसली चवचाल ! खुशाल ढळढळीत दुपारीं एका दांडगटाच्याचा हात धरून निघून जाते. पण दुःख आलें की त्याच्या महापुराखालीं हीं सारीं माणसें अगदी वाहून जातात. ओंढका अंगावर पडावा तशी ती चिमटून जाऊन, पिचून चिडीचीप होतात. हा सोशीकपणा सर्वच व्यक्तींमध्ये आढळून येतो. पण त्यांना त्याचेंहि फारसें लागतें नसतें. बकऱ्याचें ऊनऊन कालवण चांदण्यांत ज्या आनंदाने आणि तन्मयतेने हीं माणसें भुरकतात, त्याच तन्मयतेने दुःख सोसतात,—जीवनाचा तो एक अपरिहार्य काय, पण आवश्यक भाग म्हणून.

म्हातारा कारभारी मेल्यावरहि बनगरवाडीची गोष्ट चालू राहते, हा एक दोष वाटतो. कारभाऱ्याची मुलगी अंजी हिची आणि शेकू यांची नाचानाच हा भाग कांहीसा आगंतुकच वाटतो. अंजीचा थिल्लरपणा लेखकाने चोळीच्या प्रसंगाने पूर्वीच सूचित केला आहे; हें खरें असलें तरी तिच्या बापाच्या मृत्यूनंतर त्याला संदर्भ उरत नाही. शेकूच्याहि जीवितांत हा प्रणय-संबंध व्यक्तिदर्शनाच्या दृष्टीने फारसा उद्‌बोधक नाही,–शेकूचा बावळेपणा दाखविण्यापलीकडे. आणि हें झाल्यावर कादंबरी झपाट्याने समाप्त होते. म्हणजे कारभाऱ्याच्या मृत्यूनंतर कादंबरी दुसऱ्यांदा समाप्त होते.

शब्दचित्रें रेखाटण्याचा माडगूळकरांना अतिशय उत्साह आहे, आणि हीं शब्दचित्रें पराकाष्ठेच्या रसरशीत भाषेनें फुललेलीं आहेत. त्यांची ऐन रग ही भाषेच्या अस्सल मराठ-मोळ्या, खणखणीत, रोकड्या स्वरूपांत साठविलेली आहे. अशी भाषा कांत्रीप्रमाणे वाकविण्यांत माडगूळकर पटाईत आहेत. त्यांच्या भाषेला माठीव सगुण मूर्ति आहे. ती घवघवीत आणि मस्त आहे आणि तींतल्या प्रतिमा खास मराठी मनांत विणून गेलेल्या आहेत. बनगरवाडीचें सर्वच वातावरण अशा भाषेने आणि चित्रांनी भारलेलें आहे. मात्र भाषेच्या या सामर्थ्याचा माडगूळकरांना कधीकधी अनिवार मोह पडतो. मग ते पावसाचें तर पावसाचें, सुगीचें तर सुगीचें वर्णनच करीत राहतील. हीं वर्णनें कादंबरींत सामावून जात नाहीत. तीं अलग पडतात. परंतु इतरत्र माणसें, वातावरण आणि भाषा यांचा इतका एकजिनसी–एकात्म परिपाक होतो की, काय कशांतून उत्पन्न होते, तें समजतहि नाही. या परिपाकांत जी लय भरून राहिलेली आहे ती कादंबरीच्या अखेरपर्यंत आणि ती संपल्यावरहि आपला पाठपुरावा करीत राहते, आणि शेवटीं आपण एक निःश्वास सोडून कादंबरी संपवितों तेव्हा या बनगरवाडींतल्या मेंढरांचा वास जणू आपल्याभोवती भरून राहतो, आणि त्या मेंढरांचा ‘ हूं-हूं ’ करीत वास घेत फिरणारा धीट लांडगाहि जणू दिसूं लागतो. ◆ ◆ ◆

अरविंद मंगरूळकर

## कल्पनेच्या तीरावर

ज्यामधलें जीवन आपल्या जीवनाहून सर्वस्वीं भिन्न आहे, भाषा, पेहराव, धर्मकल्पना, नीतिकल्पना, अर्थजीवन, आरोग्यकल्पना, साहित्यजीवन, कलाजीवन, नगररचना, युद्धप्रकार, स्वर्गकल्पना, समाजजीवन इत्यादि गोष्टी आपल्या त्या त्या कल्पनांहून अगदी वेगळ्या आहेत, —एवढेंच नव्हे, तर त्या चमत्कारिक आणि कधी कधी हास्यस्पदहि आहेत,–अशा एखाद्या देशांत जर आपण योगायोगाने जाऊन पडलों तर आपल्याला कसें वाटेल ? आपल्या मानसिक प्रतिक्रिया कशा होतील ?—हा प्रश्न मोठा गमतीदार वाटेल. पण हाच प्रश्न श्री. वि. वा. शिरवाडकरांनी आपल्याला ‘ कल्पनेच्या तीरावर ’ या कादंबरींत विचारिला आहे. या प्रश्नाचें उत्तरहि त्यांनी अधूनमधून त्या त्या कल्पनांच्या बाबतींत टीका करीत करीत सूचित केलें आहे आणि असें करतांना आपल्याहि जीवनांतल्या कल्पनांची फेरपाहणी आणि पुनःपरीक्षा त्यांनी केली आहे.

कल्पनेच्या तीरावर–[ ले. : वि. वा. शिरवाडकर, प्र. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २, मूल्य ३ रु. ].

ही कादंबरी म्हणजे विश्वनाथ केशव विशाळकर या कलंदर तरुणाचा एका विचित्र देशांत केलेल्या धाडसी सफरीचा अनुभव आहे. विश्वनाथ हा एक खानदानी, जुन्या, वाळवंग कुटुंबांतला तरुण. त्याला प्रवासाची आणि नवनवीन अनुभव घेण्याची अतोनात हौस. या हौसेपायीच तो 'सीना' नांवाच्या एका तरुणीबरोबर तिबेटच्या प्रवासाला म्हणून निघतो. प्रवासांत असतांना हिमालयांतल्या एका निर्जन प्रदेशांत असलेल्या, पण विलक्षण दिसणाऱ्या अशा पांढऱ्या धातूच्या एका खोलीकडे येतो,—अगदी सहज. पण तिच्यामधून तो मानवाला आजवर अगदी अज्ञात असलेल्या 'शशशृंग' नांवाच्या देशांत आकाशमार्गाने जातो. पृथ्वीवरच्या सर्व प्रदेशांपासून या देशाचा संबंध तोडलेला असतो. अर्थात् विश्वनाथाला त्याच देशांत राहणें प्राप्त होतें. तो त्याचा नागरिक होतो. कांही दिवसांनी तो तेथे रमतोहि. तेथल्या वास्तव्यांत त्याला ज्या ज्या गोष्टी अनुभवावयास मिळाल्या, त्यांची तपशीलवार कहाणी त्याने कादंबरीच्या रूपाने सांगितली आहे. ही कहाणी म्हणजे एक स्वप्न-रंजन आहे पण अशा स्वप्नरंजनाच्या द्वारे आपल्या समाजकल्पना त्याने बऱ्याचशा उजळून घेतल्या आहेत आणि त्यांची फेरतपासणीहि करण्याचा यत्न केला आहे.

आपल्या ध्येयकल्पनेंत तरंगणाऱ्या एखाद्या समाजाचें सर्वस्वीं काल्पनिक चित्र रेखाटून त्या चित्राच्या द्वारे आपल्या विद्यमान समाजकल्पनांवर टीका करण्याचा मार्ग आजवर अनेक लेखकांनी अनुसरिलेला आहे. टीकेची आणि उपहासाची असली कडू गोळी कल्पनाचित्राच्या गोड अनुपानाने लवकर गिळली जाते. कारण ही टीका कधीकधी जहरी असली तरी ती नेहमीच प्रच्छन्न असते. त्यामुळे कापडाच्या जाड पिळ्याप्रमाणे ती फारशी लागत नाही. उलट कधीकधी तोंडावरून फुललेलें मोरपीस फिरवावें त्याप्रमाणे ती हवीनकोशीहि वाटते. अशा टीकेचा दर्जा अर्थातच फार उंच असावा लागतो. ती खुसखुशीत आणि मर्मग्राय असली तर फारच उत्तम. परंतु तींत समाजकल्पना तळापासून ढवळून काढून त्यांची ऐतिहासिक आणि वस्तुनिष्ठ परीक्षा करावी लागते. लोक जेवतात कसे, पेहरतात काय, बोलतात काय अशा नुसत्या बाह्य कल्पनांवरच जर ती टीका अवलंबून राहिली तर ती फुळकवणी वाटते. त्याचप्रमाणे अशा टीकेमधून परतीराला दिसणारें कल्पनाचित्र आणि समाजविश्व जितकें बाह्यतः विलक्षण पण अंतर्यामीं सुसंगत वाटेल तितक्या प्रमाणाने कादंबरीचा दर्जा अधिक उंच ठरेल. अर्थात् यासाठी कादंबरीकाराचे पाय या जगापासून सर्वस्वीं सुटले पाहिजेत; आणि ते ज्या जगाला लागतील तें जग स्वयंपूर्ण, सुसंगत, तसेंच सर्वस्वीं लोकविलक्षणहि असलें पाहिजे. तें असामान्य आणि आदर्श नसलें तरी चालेल. फार काय तें तसें नसावें. परंतु तें विचित्रपणामुळे का असेना, आकर्षक मात्र वाटलें पाहिजे. त्यांतला अनोखेपणा हें कादंबरीच्या यशस्वितेचें गमक मानावें लागेल. हें अनोखें विश्व उभें करण्यासाठी शिरवाडकरांनी शशशृंगांतल्या कांही विलक्षण समजुतींचा आश्रय केलेला आहे. उदाहरणार्थ, शशशृंगांत जेवणाचा प्रकट निर्देश करणें हें अमंगळ मानिलें जाई; इतकेंच काय, पण तो अवमान समजत असत. तेथे जेवणाचें स्थान सुगंध-सेवनाने साजरें केलें जाई; आणि विशेष समारंभाचे प्रसंग वेगवेगळ्या मादक सुगंधांनी साजरे करीत असत. तसेंच, परदेशांशीं होणाऱ्या युद्धांत रक्तपात असा कधीच होत नसे. तर उग्र खेळांच्या द्वारे कलहाचा निर्णय करीत असत. खेळांत गडी 'मरतात' ना, त्याप्रमाणे बाद झालेले खेळाडू-सैनिक ठराविक कालावधीपर्यंत जीवनांत भाग घेत नसत. अशा गोष्टींनी या नवजगताचा विलक्षणपणा आकर्षकपणाने मनांत भरतो, यांत शंका नाही. शशशृंगांत जिवंतपणींच स्वर्गारोहण कसें करतां येई, त्याचा एक अद्‌भुत अनुभव शिरवाड-

करांनी दिलेला आहे. त्याचप्रमाणे तेथलें खानदानी गायन हें केवळ पशुपक्ष्यांच्या आवाजावर आणि ध्वनींवर कसें आधारलेलें होतें याचाहि उपहासात्मक दाखला दिला आहे. परंतु अशा नवीन विश्वांत आपल्याच विश्वांतल्या आदर्शवादी कल्पना जेव्हा प्रभावी होऊं लागतात, तेव्हा मात्र कादंबरीला ढळ पोहोंचतो. आपली शुद्ध विचारसरणी म्हणजेच शशशृंगांतले रूढ नियम, असें पटविण्याचा शिरवाडकर प्रयत्न करतात तेव्हा आदर्शवाद बेप्रमाण प्रभावी होऊं लागतो आणि कादंबरीचा तोल बिघडतो. असें अनेक ठिकाणीं झालें आहे. लोकशाहीची राबवणूक, धर्मविषयक तटस्थपणा, साहित्यजीवनांतील 'मध्यमक्रम', विद्वानांची समाजसापेक्षता या कल्पनांच्या बाबतींत आदर्शवाद हा अतिरिक्त प्रभावी झाला आहे; आणि त्यामुळे स्वप्नरंजनांतली खरी गंमत उडून गेलेली आहे.

एखादा विस्तृत, विशाल, परिपुष्ट अनुभव व्यक्त करण्यासाठी 'कल्पनेच्या तीरावर' या स्वप्नरंजनाचा जन्म नाही. समाजांतल्या रूढ कल्पनांच्या परीक्षणासाठी आणि आदर्शवादी भूमिकेने त्यांचा प्रच्छन्न उपहास करण्यासाठी हें स्वप्न रंगविण्याचा शिरवाडकरांनी यत्न केला आहे. पण त्या स्वप्नाला पुरापुरा 'स्वप्नपणा' आलेला नाही. त्याच्या सीमा जागृतीशीं मिसळून तें स्वप्न वारंवार चाळविलें गेलें आहे. तसेंच 'कल्पनेच्या तीरावर' या कादंबरींत आणखी एक मोठा दोष खटकतो तो असा की, वाणसौद्याच्या दुकानांतल्या पदार्थांप्रमाणे त्यांनी प्रकरणांची विभागणी केलेली आहे. धर्म, आरोग्य, काव्य, विद्वत्ता, युद्ध असे वेगवेगळे विषय घेऊन त्यांनी कादंबरीची उभारणी केली आहे. अशी उभारणी अर्थातच कृत्रिम वाटते. या सर्वांचा एकजिनसी परिपाक झालेला आपल्याला आढळत नाही. त्यामुळे लेखकाचीं तीं तीं वैयक्तिक मतें आपल्याला चटकन कळतात, पण कादंबरीला केलेली तुकडेजोड मात्र त्याने लपत नाही आणि कादंबरी ही सोदाहरण चर्चा केलेल्या अनेक विषयांची एक कंठाळी वाटते. ◆ ◆ ◆

अरविंद मंगरूळकर.





अनुक्रमणिका

# सामार स्वीकार

(ग्रंथनाम, लेखक, प्रकाशक, व मूल्य)

१ मध्यप्रदेशांतील संशोधनकार्य-(१९३४ ते ५४) दे. गो. लांडगे, मध्यप्रदेश संशोधक मंडळ, नागपूर, १। रु.

२ दासोपंताची पासोडी-संपा. न. शे. पोहनेरकर, मराठवाडा साहित्य परिषद्, हैदराबाद, ८।९ रु.

३ भाऊसाहेब सोमण- पु. पां. गोखले, सोमणस्मारक समिति, सातारा;

४ माझ्या आठवणी- कै. ग. य. चिटणीस, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७, ८ रु.

५ ज्ञानेश्वरीचा अभ्यास - पांडुरंगशर्मा, सौ. ताराबाई अंबिके, ५०४ सदाशिव, पुणें २ ४ आणे.

६ ढासळता मनोरा (नाटक)-रा. ब. माढेकर, मराठी ग्रंथसंग्रहालय, हैद्राबाद, १।।। रु.

७ रंगरागिणी (नाटक) - अ. घ. रेळे, सौ. उषादेवी रेळे, गिरगाव रस्ता, मुंबई ४, २ रु.

८ कल्लोलिनी (काव्य) - कै. कृ. बा. कुलकर्णी, शं. कृ. कुलकर्णी, आजरे (कोल्हापूर) १ रु.

९ भावपुष्पा (काव्य) गोपाळ घाटगे, जेकब सर्कल, लष्कर ग्वाल्हेर; ८ आणे.

१० एकापरीस एक हटी (नाटक) रा. शं. नायक, का. श्री. नायक, गोमंतक छापखानो, मुंबई ४; ८ आणे.

११ एक हजार आनी तेईस - रा. शं. नायक, का. श्री. नायक, गोमंतक छापखानो, मुंबई ४; ८ आणे.

१२ आज्ञापत्र संपा- व दी. राव, राजवाडे संशोधन मंडळ, धुळें; १ रु.

१३ भारताची कहाणी- अनु-मंगेश पाडगांवकर, कुतुब पाब्लिशर्स लि. मुंबई ७, २ रु.

१४ उत्तररात्र (काव्य) त्र्यं. वि. सरदेशमुख, ९७-८ नवीपेठ, सोलापूर; २ रु.

१५ साधना (काव्य)-संपा सुधाकर प्रभु-अशोक देशपांडे, सहकार प्रकाशन, पंढरपूर; १२ आणे.

१६ रविंद्र प्रतिभेचे कोवळे किरण-अनु काका कालेलकर, नवजीवन प्रका. मंदिर अहमदाबाद; २।। रु.

१७ विज्ञानविलास-प. म. वर्वे, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १।। रु.

१८ मानिनी-(दीर्घकाव्य) श्रीराम अत्तरदे, रुक्मिणीनगर, अमरावती; २ रु.

१९ मालटेकडीवरून (काव्य) श्रीराम अत्तरदे, सौ. प्रमिला अत्तरदे, अमरावती; ८ आणे

२० समाजांत नटाची जागा (निबंध) कै. रा. ग. गडकरी, सहकार प्रकाशन, ३१५ सदाशिव, पुणें २, २।। रु.

२१ आर्हत धर्म प्रकाश-मुनिराज श्री कीर्तिविजय, जैन ज्ञानमंदिर, निपाणी.

२२ पानोळ्या (काव्य) भाऊ मांडवकर सेवा प्रकाशन, नागपूर २, २।। रु.

२३ रूप (कथा)-पु. भा. भावे, काँटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणें २; २।। रु.

२४ वर्षा (कथा)-गंगाधर गाडगीळ, लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; ३ रु.

२५ मिथिला (कथा)-अरविंद गोखले, लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; ३ रु.

२६ वरदान (काव्य)-रघुनाथ हडकर, चालना प्रकाशन, ठाकूरवाडी, मुंबई २८, ४ आणे.

२७ आई आहे शेतांत (कादं.)-र. वा. दिघे, लेखनवाचन भांडार, पुणें २; ८ रु.

२८ वाकळ (कवितासंग्रह)-कवि यशवन्त, य. दि. पेंढरकर, १९६।३४ सदाशिव, पुणें २; ३ रु.

२९ सिद्ध पुरुष व त्यांचे उद्योग–रा. स. भागवत, मराठी थिऑसफिकल फेडरेशन, पुणें ४; ४ आणे.

३० व्हीनस प्रकाशनें, पुणें २

कांचनमेघ ( कविता ) गिरीश, ३ रु.

अनामिका (कविता वा. ना. देशपांडे, २॥रु.

गांधींजीचे जीवनप्रसंग–घोरपडे-गोंधळेकर, १। रु.

सांस्कृतिक दिनपाठ-घोरपडे-गोंधळेकर, ६ आणे.

३१ के. भि. ढवळे, मुंबई २

काळकर्ते शिवरामपंत परांजपे–दा. न. शिखरे, ८ आणे.

मोरूनाना आणि इतर गोष्टी–रजनीकांत भांडारे, ४ आणे.

चंद्रबळ–शशिकला आळंदकर. ८ आणे.

लोकांचा राजा [ चार अंकी नाटक ले. चिं. य. मराठे प्रकाशन शं. ना. अंधृटकर मराठी प्रकाशक १२ त्रिभुवन रोड, मुंबई ४ किं. २ रु. ]

भारतीय मर्दन शास्त्र [ लेखक श्री. वासुदेव दामोदर पळणिटकर प्रकाशक वि. शं वैद्य समर्थ सेवा मंडळ, सज्जनगड ( उत्तर सातारा ) मूल्य २ रु. ]

माझी संसार यात्रा [ ले. रियासतकार गोविन्द सखाराम सरदेसाई प्रकाशक के. भि. ढवळे कर्नाटक हाऊस चिरा बाझार मुंबई २ मूल्य ६ रु.

प्राचीन मराठी वाङ्मयाचें स्वरूप [ले. प्रा. ह. श्री. शेणोलीकर प्रकाशक मा. वा. धोपेश्वरकर १५०६ मारुतीगल्ली बेळ. मू. २॥ रु.]

फूटपायरी [ संगीत सामाजिक नाटक ले. स. ना. सूर्यवंशी प्रकाशिका सौ. सुधा रायकर श्रीसरस्वती निवास, श्रीकृष्णनगर बोरिवली मूल्य १॥ रुपया ]

प्रतिबिंब [ विनोदी रंगकथा ले. रघुवीर पाटील प्रकाशकः चालना कार्यालय मुंबई नं. २८ पुष्प ३ रें ]



# १९५५–५६ इतिवृत्त

**सभासद–संख्या :—** वर्षअखेर सभासदांची संख्या १५६७ आहे. त्यांपैकी ११०० साधारण, २ उपकर्ते, ४ आश्रयदाते, ९ सहायक, ३२ हितचिंतक व ४२० तहह्यात अशी वर्गवारी आहे.

**आर्थिक स्थिति :—** सोबत आयव्ययपत्रक व ताळेबंद हीं दोन पत्रकें आहेत. त्यांवरून परिषदेच्या आर्थिक स्थितीची कल्पना येईल.

**स्मृतिदिन :—** ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १०।४।५६ ला दोन कार्यक्रम झाले. सकाळीं ८ वाजतां कै. केतकर यांच्या समाधीला पुष्पांजलि अर्पिण्यांत आली. सायंकाळीं ६॥ वाजतां श्री. गोपीनाथ तळवलकर यांचें व्याख्यान झालें. दि. २० जुलैला कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनीं श्री. के नारायण काळे यांचे 'वामनराव आणि साहित्य–समीक्षण' या विषयावर व्याख्यान झालें. कै. न. चिं. केळकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १८ आक्टोबरला केळकर–स्मारक–समिति व परिषद् यांच्या वतीने टिळक–स्मारक–मंदिरांत राज्यपाल डॉ. हरेकृष्ण मेहताव यांच्या अध्यक्षेतेखाली प्रकट सभा झाली व तींत प्रा. श्री. म. माटे व सांगलीचे श्री. गोडबोले वकील यांचीं भाषणें झालीं. कै. केशवसुत यांचा ५० वा स्मृतिदिन ७ नोव्हेंबरला पाळण्यांत आला. या दिवशीं आचार्य भागवत यांचें व्याख्यान व श्री. पार्श्वनाथ आळतेकर यांचें कवितागायन असे दोन कार्यक्रम झाले. १७ नोव्हेंबरला कै. देवल यांच्या जन्मशताब्दीनिमित्त श्री. वसंत शांताराम देसाई यांचें व्याख्यान झालें व या प्रसंगीं मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर यांनी देवलांच्या नाटकांतील कांही पदें गाऊन दाखविलीं. कै. माधव ज्यूलियन स्मृतिदिनीं (२९ नोव्हेंबर) प्रा. द. ल. गोखले यांचें श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षेतेने व्याख्यान झालें.

**व्याख्यानमाला :—** परिषदेच्या वार्षिक वाङ्मयसमालोचनमालेंत यंदा दोन व्याख्यानें झालीं. ३० नोव्हेंबरला श्री. शरच्चंद्र मुक्तिबोध (काव्य) व १ डिसेंबरला प्रा श्री. के. क्षीरसागर (टीका) हे व्याख्याते होते.

**भेटी :—** यंदाच्या वर्षी पुढील मान्यवरांनी परिषदेला भेटी दिल्या. श्री. दुर्गा भागवत (३०–४–५५), साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास (१–५–५५), श्री. शं. वि. जोशी (११–५–५५), सौ. कमलाबाई किबे (३–६–५५), श्री. पु. वा. काळे व सौ. अनुसूयाबाई काळे (८–६–५५), श्री. ग. त्र्यं. माडखोलकर (२३–७–५५), प्रो. एडवर्ड शिल्स व प्रो. मेहरा (१३–८–५५), श्री. अरविंद गोखले, श्री. महादेवशास्त्री जोशी, श्री. व्यंकटेश माडगूळगर, श्री. दि. बा. मोकाशी, सौ. वसुंधरा पटवर्धन, सौ. सरिता पतकी, श्री. मंगेश पतकी, श्री. श्री. ज. जोशी, द. मा. मिरासदार (११–९–५५), श्री. रा. अ. काळेले (२१–१२–५५), श्री. ग. न. पंडित (२१–३–५६).

**दुखवटा–सभा :—** कै. अ. ना. भालेराव व कै. ज. र. आजगावकर यांच्या निधनानिमित्त ४।९।५५ रोजीं सकाळीं म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षेतेने सभा

झाली. श्री. के. नारायण काळे, श्री. बापूराव नाईक, प्रा. श्री. म. माटे, प्रा. मंगरूळकर, डॉ. कोलते, प्रा. भुसारी, श्री. कृष्णराव मराठे, प्रा. वा. दा. गोखले यांनीं भाषणें करून श्रद्धांजलि वाहिली.

संमेलनः—म. सा. संमेलनाचें ३८ वें अधिवेशन पंढरपूर येथे 'मराठी साहित्य मंडळ' या संस्थेतर्फे ३०–३१ डिसेंबर व १ जानेवारी या दिवशीं डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या अध्यक्षतेने भरलें होतें. संमेलनाच्या आदल्या दिवशीं तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्तें श्री. ज्ञानेश्वरमहाराजांच्या पुतळ्याचें उद्घाटन झालें. खासदार न. वि. गाडगीळ यांनी संमेलनाचें उद्घाटन केलें. संमेलनाला जोडून कथा व महिला-वाङ्मय अशीं दोन शाखा-संमेलनें भरलीं होतीं व त्यांचीं अध्यक्षपदें प्रा. गंगाधर गाडगीळ व सौ. मालती बेडेकर यांच्याकडे होतीं. कथासंमेलनप्रसंगीं नवकथेवर चर्चा झाली. साहित्यिकांची दिंडी, नाट्यप्रयोग, काव्यगायन, स्थानिक कलावतांचें वृंदवादन, भाषाभगिनी संमेलन इत्यादि कार्यक्रम होऊन संमेलन समाप्त झालें. संमेलनासाठी सुमारें ६०० परस्थ प्रतिनिधि उपस्थित होते. संमेलन यशस्वी करण्यासाठी श्री. द. त्र्यं. आराध्ये-पाटील, स्वागताध्यक्ष श्री. बाबूराव जोशी, चिटणीसद्वय श्री. पां. भा. डिंगरे–बा. रा. रत्नपारखी, श्री.उत्पात, श्री. वडवे, श्री. अभंगराव इत्यादि कार्यकर्त्यांनीं अतिशय परिश्रम घेतले.

संमेलन-सभाः—पंढरपूरच्या संमेलनाचा वृत्तान्त व संदेश सांगण्यासाठी ४ जानेवारीला डॉ. शं. दा पेंडसे यांच्या अध्यक्षतेने प्रकट सभा झाली. श्री. य. दि. पेंढरकर, प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. वा. दा गोखले, श्री. म. दा. साठे, श्री. कृष्णराव मराठे यांनी आपापल्या दृष्टिकोनांतून संमेलनाची माहिती सांगितली.

प्रतिनिधित्वः—भारत सरकारचें 'ऑफीशिअल लँग्वेज कमिशन' दि. १६-१०-५५ला पुणें येथे आलें असतां त्यापुढे म. सा. परिषदेतर्फे कार्याध्यक्ष चिं. वि. जोशी यांची साक्ष झाली. कार्याध्यक्षांबरोबर प्रा. श्री. के. क्षीरसागर होते. दि. २६–२७ डिसेंबरला चिदंबर-जवळ अन्नमलाईनगर येथे भरलेल्या भारतीय प्राच्यविद्या परिषदेला प्रा. अ. गं. मंगरूळकर परिषदेतर्फे उपस्थित होते.

शाखासभावृत्तान्त—सोलापूर–श्री. अरविंद गोखले, प्रा. य. द. भावे, श्री. बा. रं. सुंठणकर, प्रा. वा. दा. गोखले व डॉ. ना. गो. नांदापूरकर यांनी भेटी दिल्या. कै. अ. ना. भालेराव व कै. शं. द. जावडेकर यांच्याविषयी दुखवटा व्यक्त करण्यांत आला. पंढरपूरच्या म. सा. संमेलनाला श्री. शं. गो. पटवर्धन यांनी बरेंच साहाय्य केलें. श्री. शां. ब. कुलकर्णी व श्री. ज. रं. ळळीत यांची चिटणीस म्हणून नव्याने नियुक्ति झाली. कै. राजसबाई आळंदकर यांच्या स्मरणार्थ श्री. पद्माकर आळंदकर यांच्यातर्फे चांदीचा 'साहित्यसूर्य' (ढाल) म. सा. परिषदेला शाखेने अर्पण केला. सातारा—द. सातारा जिल्ह्यांतील लेखक व कवि यांचीं संमेलनें भरविलीं होतीं. श्री. वि. स. खांडेकर यांचें व्याख्यान झालें व कवि गिरीश यांचा सत्कार करण्यांत आला. कै. केशवसुत व कै. देवल यांचे स्मृतिदिन साजरे करण्यांत आले. या प्रसंगीं कवि निकुंब व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचीं व्याख्यानें झालीं. प्रतिवर्षाप्रमाणे परीक्षावर्ग घेण्यांत आले. सातारा–डॉ. द. न. गोखले, व श्री. मो. रा. वाळंबे यांची नव्याने कार्याध्यक्ष व कार्यवाह म्हणून नियुक्ति झाली. डॉ. गोखले यांचीं 'शुद्धलेखना' वर दोन व्याख्यानें झालीं. आचार्य दोंदे यांचें 'शिक्षण' विषयक व्याख्यान झालें. शाखेने यंदा चित्रपटावर चर्चा घडवून आणली व ती खूपच रंगली. परीक्षा-केंद्राचें कार्य नेहमीप्रमाणे चालू आहे.

अनुक्रमणिका

मध्यप्रदेश--प्राचार्य श्री. ल. पांढरीपांडे व श्री. र. वि. कुलकर्णी यांची अध्यक्ष व कार्यवाह म्हणून निवड झाली. शाखासभेतर्फे यंदा श्री. न. वि. गाडगीळ, श्री. सोनोपंत दांडेकर, डॉ. रा. शं. वाळिंबे व डॉ. शं. दा. पेंडसे यांचा सत्कार करण्यांत आला, व संयुक्त महाराष्ट्राच्या ठरावाला पाठिंबा देण्यांत आला.

वाङ्मयेतिहास :— दि. ४।९।५५ ला वाङ्मयेतिहास-योजनेचें निर्वाहक मंडळ व संपादक मंडळ यांच्या सभा झाल्या व ६ खंडांचे आराखडे संमत करण्यांत आले. दि. १२-२-५६ ला भरलेल्या निर्वाहक मंडळाच्या सभेंत संपादकांकडून आलेल्या सूचनांचा विचार झाला. खंडसंपादकांना लेखनाच्या कामास सुरुवात करावी असा आदेश देण्यांत आला असून त्याप्रमाणे कांहींनी लेखनास आरंभ केला आहे.

परीक्षावर्ग :— प्राज्ञ-विशारद वर्गासाठी यंदा पुढील व्यक्तींनी अध्यापनकार्य केलें :— प्रा. श्री. म. माटे, श्री. य. न. केळकर, श्री. प्र. शं. जोशी, प्रा. रा. ना गद्रे, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. ग. प्र. प्रधान, श्री. मा. ज. तांबे, श्री. ग. स. शुक्ल, प्रा. वा. दा. गोखले, डॉ. स. वि. सहस्रबुद्धे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, डॉ. प्र. न. जोशी, व डॉ. रा. शं. वाळिंबे.

परीक्षा—१९५५ च्या डिसेंबरमध्ये झालेल्या परीक्षांना विविध केंद्रांतून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले व उत्तीर्ण झाले.

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण | शेकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| प्रथमा | १८९२ | १४९० | ७९ |
| प्रवेश | ११९३ | ८३५ | ७० |
| प्राज्ञ | ६०७ | ३७५ | ६२ |
| विशारद | ९० | ४० | ४४ |
| आचार्य | १० | १ | १० |
| | ३७९२ | २७४१ | |

## परीक्षा-केंद्रें

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | गिरगांव | मुं. म. सा. संघ | वा. रा. ढवळे |
| २ | दादर | ज. ए. इ. गर्लस्कूल | स. इ. कुळकर्णी |
| ३ | विलेपार्ले | टिळक विद्यालय | मा. सी. पेंढारकर |
| ४ | वसई | वाघ विद्यालय | बा. ल. पंडित |
| ५ | कल्याण | सुभेदारवाडा | श्री. ज. बापट |
| ६ | पुणें | नू. म. वि. प्रशाळा | वि. वि. बोकील |
| ७ | पुणें | रास्ता पेठ हायस्कूल | द. पि. अत्रे |
| ८ | इंदापूर | आयडियल इं. स्कूल | वि. शं. केळकर |
| ९ | जुन्नर | न्यू स्कूल | मुख्याध्यापक |

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| १० | तळेगाव | नूतन विद्यामंदिर | ग. वि. केतकर |
| ११ | देहू | तुकाराम विद्यालय | कृ. आ. ढमढेरे |
| १२ | पणदरें | मुलांची शाळा १ | ह. ना. जगताप |
| १३ | बारामती | शाहू हायस्कूल | शं. बा. पाटील |
| १४ | मंचर | म. गांधी विद्यालय | भा. गे. पाटील |
| १५ | वडगाव-निंबाळकर | स्वातंत्र्य विद्यामंदिर | दि. पां. भुंजे |
| १६ | शिरूर | विद्याधाम | गो. ना. वाघ |
| १७ | सासवड | म. ए. सो. हायस्कूल | ह. आ. उंब्राणीकर |
| १८ | सातारा | न्यू इं. स्कूल | मो. रा. वाळंबे |
| १९ | औंध | प्रा. टी. ट्रे. कॉलेज | दि. रं. कुलकर्णी |
| २० | उंब्रज | म. गांधी विद्यालय | आ. सि. मुळे |
| २१ | कराड | शिवाजी विद्यालय | वि. गं. सप्रे |
| २२ | कोरेगाव | न्यू सरस्वति इं. स्कूल | हि. त. शहा |
| २३ | चाफळ | समर्थ विद्यामंदिर | रा. ब. झांबरे |
| २४ | रहिमतपूर | प्रौढ विद्यालय | स. के. देशपांडे |
| २५ | शिरवळ | आदर्श विद्यालय | ल. मा. सुभेदार |
| २६ | सांगली | सिटि हायस्कूल | के. जि. दीक्षित |
| २७ | अष्टे | म. गांधी विद्यालय | मुख्याध्यापक. |
| २८ | कवलापूर | नेहरू विद्यालय | बा. बा. पाटील |
| २९ | कुंडल | प्रतिनिधि हायस्कूल | श्री. ग. दाढे |
| ३० | कासेगाव | आझाद विद्यालय | दत्तात्रय घोरपडे |
| ३१ | खानापूर | विद्यार्थी-बोर्डिंग | ग. कृ. माने |
| ३२ | चिकुर्डे | केंद्रशाळा | ख. भा. जाधव |
| ३३ | जत | रामराव विद्यामंदिर | कृ. पां. जोशी |
| ३४ | बुधगाव | हायस्कूल | नी. वि. परचुरे |
| ३५ | मालेगाव | हायस्कूल | रा. पि. पाटील |
| ३६ | मिरज | आर. एम. हायस्कूल | ना. कृ. चितळे |
| ३७ | शिरोळें | न्यू इं. स्कूल | मुख्याध्यापक |
| ३८ | अहमदनगर | कन्याविद्यामंदिर | ग. ज. चितांबर |
| ३९ | भिंगार | मिडल स्कूल | द. ब. डावरे |
| ४० | पाथर्डी | जैन विद्यालय | प. पु. मेहेंदळे |
| ४१ | पारनेर | पारनेर इं. स्कूल | ना. कृ. मुळे |
| ४२ | संगमनेर | पेटिट हायस्कूल | ना. के. उपासनी |
| ४३ | सोलापूर | ह. दे. शाळा | के. पं. मंगळवेढेकर |
| ४४ | अकलूज | एस्. पी. एम्. विद्यालय | जा. बा. काझी |
| ४५ | अक्कलकोट | शहाजी हायस्कूल | ग. म. वैद्य |
| ४६ | कुर्डूवाडी | नू. वि. हायस्कूल | उ. ग. पारखे |

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| ४७ | पंढरपूर | कवठेकर हायस्कूल | बा. रा. रत्नपारखी |
| ४८ | बार्शी | मॉडेल हायस्कूल | रा. ग. नाडकर |
| ४९ | मंगळवेढें | इंग्लिश स्कूल | श्री. सं. कदम |
| ५० | नाशिक | पेठे विद्यालय | वि. ह. फाळके |
| ५१ | नांदगाव | व्ही. जे. हायस्कूल | वा. श्री. पुरोहित |
| ५२ | निवाणें | शाळा | भा. अ. चांदोरकर |
| ५३ | निफाड | इंग्लिश स्कूल | ह. वि. जोगळेकर |
| ५४ | पिंपळगाव | हायस्कूल | भा. पं. पाटील |
| ५५ | मनमाड | जी. आय. पी. इं. स्कूल | द. वि. केतकर |
| ५६ | जळगाव | रा. रू. विद्यालय | मनुभाई देशाई |
| ५७ | अमळगाव | आदर्श विद्यालय | डी. एस्. पाटील |
| ५८ | अमळनेर | प्रताप कॉलेज | ल. के. कुलकर्णी |
| ५९ | उंबरखेडें | स. मा. विद्यालय | रा. धों. वाणी |
| ६० | चाळीसगाव | आ. वं. हायस्कूल | ल. नी. छापेकर |
| ६१ | चोपडें | प्रताप विद्यामंदिर | य. गो. हरताळकर |
| ६२ | नांदेड | मराठी शाळा | चिं. दि. अत्तरदे |
| ६३ | थोरगव्हाण | डी. एस्. हायस्कूल | मुख्याध्यापक |
| ६४ | पाचोरा | गो. से. हायस्कूल | वि. प्र. कुळकर्णी |
| ६५ | फैजपूर | म्यु. हायस्कूल | रा. प्र. चौधरी |
| ६६ | भडगाव | न्यू इं. स्कूल | गो. गो. तेलंग |
| ६७ | मालोद | न्यू इं. स्कूल | भा. मो. पाटील |
| ६८ | भुसावळ | द. शि. हायस्कूल | ल. वा. वैद्य |
| ६९ | शेंदुर्णी | न्यू इं. स्कूल | य. ब. भोकरे |
| ७० | सावदा | आ. गं. हायस्कूल | स. भि. वारके |
| ७१ | साळवें | इंग्लिश विद्यालय | अ. र. पाटील |
| ७२ | धुळें | आ. प्रा. ट्रे. कॉलेज | हि. सु. पाटील |
| ७३ | तळोदें | के. डी. हायस्कूल | तु. सी. पटेल |
| ७४ | नरढाणें | विकास विद्यालय | गो. वा. जोग |
| ७५ | नंदुरबार | म्युनि. हायस्कूल | शं. रा. जोशी |
| ७६ | नेर | न्यू इं. स्कूल | मो. शं. पाटील |
| ७७ | प्रकाशें | स. वि. मंदिर | मुख्याध्यापक |
| ७८ | शहादें | म्यु. न्यू इं. स्कूल | गो. य. जोशी |
| ७९ | शिंदखेडें | न्यू इं. स्कूल | पं. स. करंजीकर |
| ८० | साक्री | न्यू इं. स्कूल | सु. शा. शहा |
| ८१ | अलीबाग | इंडस्ट्रियल हायस्कूल | वि. दा. परांजपे |
| ८२ | पनवेल | ट्रेनिंग कॉलेज | वे. से. गजेंद्रगडकर |
| ८३ | महाड | परांजपे विद्यामंदिर | वि. त्रि. चांदे |

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| ८४ | रत्नागिरी | महिला विद्यालय | मुख्याध्यापिका |
| ८५ | कट्टा | वराडकर हायस्कूल | सी. व्ही. वराडकर |
| ८६ | कणकवली | एस्. एम्. हायस्कूल | बा. सी. सावंत |
| ८७ | जैतापूर | न्यू इं. स्कूल | ग. म. सिनकर |
| ८८ | दापोली | नॅशनल हायस्कूल | पं. मु जोशी |
| ८९ | मालवण | लक्ष्मीबाई कन्याशाळा | मुख्याध्यापिका |
| ९० | वेंगुर्लें | पाटकर हायस्कूल | रा. ह. गांवस्कर |
| ९१ | सावंतवाडी | कळसुलकर हायस्कूल | रा. ज. तेंडोलकर |
| ९२ | कोल्हापूर | राजाराम हायस्कूल | वि. के. परुळेकर |
| ९३ | गडहिंग्लज | एम्. आर हायस्कूल | गो. सु. गोंधळी |
| ९४ | बेळगाव | वाङ्मयचर्चामंडळ | वा. आ. सावंत |
| ९५ | अंकोला | पी. म. हायस्कूल | एस्. व्ही. पिकळे |
| ९६ | ढोलगरवाडी | बेसिक शाळा | शं. म. मगदूम |
| ९७ | निपाणी | म्युनि. हायस्कूल | मुख्याध्यापक |
| ९८ | अकोला | सीताबाई महाविद्यालय | ना. रा. केळकर |
| ९९ | हैद्राबाद | मराठवाडा साहित्य परिषद् | न. शे. पोहनेरकर |
| १०० | औरंगाबाद | श्रीसरस्वतीभुवन | न. दा. वाघ |
| १०१ | उपळें | एच्. जी. हायस्कूल | रा. मा. घोगरे |
| १०२ | उमरी | नूतन विद्यालय | रं. श्री. कुलकर्णी |
| १०३ | उंवरगें | भारत विद्यालय | श्री. रं. कुलकर्णी |
| १०४ | अंबेजोगाई | श्री. यो. नू. विद्यालय | ए. मा. कुलकर्णी |
| १०५ | औंढा | मा. स. शिक्षणालय | लिं. प्र. चोंढेकर |
| १०६ | कळंब | सरकारी हायस्कूल | केशवराव कोकीळ |
| १०७ | नळदुर्ग | प्रशाला | दि. भा. तडवलकर |
| १०८ | नांदेड | प्रतिभा-निकेतन | वि. द. सर्जे |
| १०९ | परभणी | नूतन विद्यामंदिर | अं. भा. पाठक |
| ११० | पैठण | हायस्कूल | खंडेराव खंडाळकर |
| १११ | माजलगाव | हायस्कूल | वा. शं. देशपांडे |
| ११२ | शफेपूर | माध्यमिक शिक्षणालय | मो. आ. पाठक |
| ११३ | सेलू | नूतन विद्यालय | सो. ना. कुलकर्णी |
| ११४ | हिंगोली | भारतीय विद्यामंदिर | राजेश्वरराव देशपांडे |
| ११५ | इंदूर | म. सा. सभा | वि. ह. आपटे |

या वर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पहिले आलेले उमेदवार—

प्रथमा—नारायण खंडेराव पतकी, अक्कलकोट ( पारितोषिक रु. १० )

प्रवेश —प्रकाश विनायक सुलाखे, बार्शी ( पारितोषिक रु. १५ )

प्राज्ञ —शैला गंगाधर राजहंस, पुणें ( पारितोषिक रु. २० ).

विशारद—श्रीकांत सदाशिव व मोरेश्वर सदाशिव गोसावी, पुणें (रु. २५ विभागून)

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका—चालू वर्षी श्री. वा. रा. ढवळे यांच्या संपादकत्वाने चार अंक निघाले. ' पत्रिके ' ला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येतात :—

दैनिकें—लोकसत्ता, सकाळ, भारत, लोकशक्ति व तरुणभारत.

त्रिसाप्ताहिक—केसरी.

अर्धसाप्ताहिक—मराठवाडा.

साप्ताहिकें—मौज, नवयुग, साधना, धनुर्धारी, विवेक, चिकित्सक, अर्थ, महाराष्ट्र (नागपूर), विजय, प्रबोधचंद्रिका, मालवणत्रिका, युगांतर, सोविएत युनियन समाचार, सोवियतभूमि.

मासिकें—विशालभारत, अजंता, राष्ट्रभारती, राष्ट्रवाणी, किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, सह्याद्रि, सत्यकथा, चित्रमयजगत्, व्यायाम, पुरुषार्थ, महाराष्ट्र, सुदर्शन, युगवाणी, सुषमा, महात्मा, रोहिणी, प्रसाद, नवभारत, प्रेमबोध, महाराष्ट्रविस्तार, धर्मचक्र, भारतमित्र, एकता, पी. ई. एन्. जयभारती, साहित्यसहकार, बालमित्र, शुक्लेंदु, सर्वोदय, चालना, सन्मति, प्रतिष्ठान, अमृत, पराग, वीरशैव, यशवंत, शालापत्रक, उद्यम.

पाक्षिकें—नागरी जीवन.

त्रैमासिकें:—ज्ञानेश्वर, तत्वज्ञानमंदिर, भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक, मराठी-संशोधन पत्रिका, Bulletin of the Deccan College Post-Graduate Research Institute, आलोचना.

केसरी-मराठा संस्थेची ग्रंथदेणगी :— गतवर्षीप्रमाणे केसरी-मराठा संस्थेने या वर्षी परिषदेला अनेक ग्रंथ भेटीदाखल दिले. या देणगीबद्दल परिषद् संस्थेची आभारी आहे. कै. सी. न. साने यांच्या संग्रहांतील सुमारें १०० पुस्तकें भेटीदाखल आलीं.

साक्षरता-प्रसार कोश :— महाराष्ट्र विभागाचे समाजशिक्षण अधिकारी श्री. वा. ब. कर्णिक यांनी साक्षरता-प्रसारासाठी उपयोगी पडेल असा मराठी शब्दकोश साहित्य परिषदेने तयार करावा अशी सूचना केली. परिषदेने हें काम परिषदेच्या संशोधनसमितीकडे सोपविलें. या समितींत प्रा. चिं. वि. जोशी (कार्याध्यक्ष), प्रा. वा. दा. गोखले (चिटणीस), श्री. चिं. ग. कर्वे (सभासद), प्रा. रा. श्री. जोग (सभासद) असे सदस्य आहेत. या समितीच्या आदेशानुसार प्रा. गोखले यांनी एक विस्तृत योजना तयार केली व ती शिक्षणखात्याला सादर केली. शिक्षणखात्याने योजना मान्य करून मार्च ५६ अखेर प्रस्तुत कोश तयार करून शिक्षण-खात्याच्या स्वाधीन करावा असें सांगितलें. खर्चासाठी म्हणून १५०० रु. परिषदेच्या हवाली करण्यांत आले.

संशोधन-समितीने पुढील तज्ज्ञांचें मार्गदर्शनमंडळ नियुक्त केलें. श्री. बा. न. जगताप, श्री. वा. ब. कर्णिक, प्रि. स. रा. भट, प्रि. सौ. गंगूबाई पटवर्धन, श्री. एस्. एल्. थोरात व श्री. एन्. जी. शुक्ल. संशोधक-समिति व मार्गदर्शक-समिति यांच्या अनेक संयुक्त बैठकी होऊन त्यांच्या सूचनांप्रमाणे प्रस्तुत कोशाचें काम संकल्पित अवधींत पुरें करण्यांत आलें. साक्षरता-प्रसारासाठी सांप्रत तयार झालेलीं कांहीं पुस्तकें, निरनिराळ्या जिल्ह्यांतील प्राथमिक

[ पुढील मजकूर इतिवृत्त पान ८ वर पहा. ]

# महाराष्ट्र–साहित्य–

## दिनांक १ एप्रिल १९५५ ते दिनांक ३१ मार्च,

| खर्च | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
| --- | --- | --- |
| **संस्था खर्च :** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड. | ३,७९५– १–० | |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर व भुअी भाडें. | ११३– ०–० | |
| वीज व दिवाबत्ती. | ८१– ४–९ | |
| छपाई | २५६– ०–३ | |
| वादील | १०४– ६–० | |
| टपाल व तार. | २०६–११–३ | |
| प्रवास खर्च व प्रचार. | ५१९–१०–० | |
| आतिथ्य. | १९६–१३–० | ५,२७२–१४–३ |
| **सभा व उपसमिति :** | | |
| कार्यकारी व नियामक मंडळ. | ५७३– ६–६ | |
| शाखासभा. | २०७–१५–४ | |
| उपसमिति. | ३७–१२–० | |
| परीक्षा खर्च. | ६,७६४– ७–९ | |
| "पत्रिका" खर्च (छपाअी व टपाल). | ३,९००– ८–६ | |
| किरकोळ. | २६७– ०–० | |
| इमारत दुरुस्ती. | ५१५–१०–० | |
| घसारा. | ३००– ०–० | १२,५६६–१२–१ |
| **साक्षरता कोष :** | | १,५००– ०–० |
| एकूण...रु..., | ... | १९,३३९–१०–४ |

तपासलें, बरोबर आहे. बॉम्बे पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणें अलाहिदा दाखला दिला आहे.

(सही) जी. एम्. ओक (चार्टर्ड अकौंटंटस्) १७-४-५६.

## परिषद्, पुणें २.

### १९५६ अखेर मुदतीचें जमाखर्चाचें पत्रक.

| जमा | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
|---|---|---|
| णग्या : | | |
| माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर. | ३१०– ०–० | |
| पुणें म्युनिसिपल कॉर्पोरेशन | २००– ०–० | ५१०– ०–० |
| वर्गणी : | | |
| साधारण सभासद. | २,३७९– ०–० | |
| संलग्न संस्था. | ७७– ०–० | |
| "पत्रिका." | २२८–१०–० | २,६८४–१०–० |
| संमेलन | ४८९– ०–० | |
| व्याज | १६४– ४–० | |
| ट्रस्टींकडून व्याजांतून खर्चासाठीं. | १,०००– ०–० | |
| किरकोळ जमा. | ४७– २–० | |
| परीक्षा शुल्क. | ११,७५२– २–० | |
| "पत्रिका." | ८२५– ८–० | १४,२७८– ०–० |
| साक्षरता कोष | | १,५००– ०–० |
| उत्पन्नापेक्षां अधिक खर्च | | ३६७– ०–४ |
| एकूण...रु.... | ... | १९,३३९–१०–४ |

टीप :—यात येणें अुत्पन्न व देणें राहिलेला खर्च व आगाऊ आलेले अुत्पन्न (वर्गणी वगैरे) यांचा जमाखर्च अंतर्भूत नाहीं.

# महाराष्ट्र–साहित्य–

दिनांक ३१ मार्च १९५६

| निधी व देणीं. | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
|---|---|---|
| **सामान्य निधि ( म. सा. परिषद् ) :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | १८,३५२ –९–३ | |
| वजा : चालू सालांतील अधिक खर्च. | (–) ३६७–०–४ | १७,९८५–८–११ |
| **इमारत निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ... ... | २३,९३८–२–० |
| **ग्रंथालय निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १४,९११–०–० | |
| अधिक : चालू सालांतील जमा. | (+) ५७०–०–० | |
| अधिक : परीक्षणासाठीं आलेल्या पुस्तकांची किंमत. | (+) १११–८–० | १५,५९२–८–० |
| **इतिहास योजना :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | १,६१७–५–९ | |
| वजा : चालू सालांतील खर्च | (–) ७२२–७–० | ८९४–७–० |
| **चिपळूणकर स्मारक निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ... | १७,१४०–२–० |
| **प्रकाशन निधि ( पारितोषिक ):** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | ... | २०४–०–० |
| **सामान्य निधि ( विश्वस्तांकडील ) :** | | |
| दि. ३१-३-१९५६अखेर जमा–बाकी. | | १८,५६८–०–१ |
| **प्रॉव्हिडंट फंड ( स्टाफ ) :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | १,२५६–५–६ | |
| अधिक : चालू सालांतील जमा. | (+) २३२–२–० | |
| व्याजाबद्दल | (+) १८–८–० | १,५०६–१५–६ |
| **घसारा निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | ३,३००–०–० | |
| अधिक : चालू सालांतील जमा. | (+) ३००– ०–० | ३,६००–०–० |
| **प्रकाशन निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | २,९४१–६–० | |
| अधिक : चालू सालांतील वाढावा. | (+)५९२२–१३–११ | ८,८६४–३–११ |
| **इतर देणीं :** | | |
| तहह्यात वर्गणी विश्वस्तांकडें वर्ग करणेची. | ६०४–०–० | |
| अनामत. | २५०–०–० | |
| भुईभाडे. | १५–०–० | ८६९–०–० |
| एकूण...रु.... | ... | १,०९,१६२–१५–५ |

तपासलें, बरोबर आहे. बॉम्बे पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणें अलाहिदा दाखला दिला आहे.

## परिषद्, पुणें २.

रोजींचा ताळेबंद

| जिंदगी व येणीं | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
|---|---|---|
| अिमारत (पक्तर खर्च) लीज–होल्ड जागेवर: | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | | ४५,०८३–५–६ |
| फर्निचर व डेडस्टॉक ( खरेदीनें ) | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | २,४१८-१२-९ | |
| अधिक : चालू सालांतील खरेदी. | +३४८–६–० | २,७६७–२–९ |
| सायकल ( खरेदीनें ) : | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | | २९३–८–० |
| ग्रंथालय खातें : | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ११,११५–४–३ | |
| अधिक : चालू सालांतील खर्च | +४१७-११-९ | |
| अधिक : परीक्षणासाठी आलेल्या पुस्तकांची किंमत. | +१११–८–० | ११,६४४–८–० |
| रोखे आणि शेअर्स : | | |
| ४ टक्के बॉम्बे म्यु. डिबेंचर्स द. किं. रु. ५०० | | |
| ३ टक्के डेव्ह. लोन. द. किं. रु. १०८०० | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ द. किं. रु. २७०० | १४,०००–०–० | |
| २५ शेअर्स बॉम्बे स्टेट को–ऑपरेटिव्ह बँक लिमिटेडचे प्रत्येकीं रु. ५० चा. | १,२५०–०–० | |
| २३ शेअर्स सेन्ट्रल प्रॉव्हिन्स रेल्वे कं. चे प्रत्येकीं रु. १०० चा. | २,३००–०–० | |
| ३॥ टक्के १० वर्षे ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट सर्टिफिकेट | १३,०००–०–० | ३०,५५०–०–० |
| कायम ठेव(बँक ऑफ महाराष्ट्र लि.,पुणें)कडे | ... | ३,०००–००– |
| प्रकाशन खातें (शिल्लक पुस्तकाची किंमत),: चिटणिसांनीं दाखला दिल्याप्रमाणे व त्यांत दिलेल्या किंमतीप्रमाणे. | ... | ६,१६७–०–० |
| येणीं ( असुरक्षित पण शहाजोग ). | ... | १८३–३–६ |
| अखेर शिल्लक : | | |
| रोख हातांत. ... | ३३-१५-० | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि., पुणें. | ६०-१३-६ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणें. | ६,८५६–७–७ | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, | १,०१६–०–१ | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि.(प्रॉ. फंड.) | १,५०६-१५-६ | ९,४७४–३–८ |
| एकूण....रु.... | ... | १,०९,१६२-१५-५ |

( सही ) जी. एम्. ओक ( चार्टर्ड अकौंटंटस् ) १७-४-५६

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र–साहित्य

## १९५६–५७ चा

### जमा

| खातें | अंदाज १९५५–५६ | | | प्रत्यक्ष जमा १९५५–५६ | | | अंदाज १९५६–५७ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | रु. | आ. | पै. | रु. | आ. | पै. | रु. | आ. | पै. |
| ट्रस्टींकडून येणारें व्याज | १००० | ० | ० | १००० | ० | ० | १००० | ० | ० |
| साधा. सभासद वर्गणी | २१०० | ० | ० | २३७९ | ० | ० | २२०० | ० | ० |
| पत्रिका वर्गणी | २०० | ० | ० | २२८ | १० | ० | २०० | ० | ० |
| संलग्न संस्था वर्गणी | ८६ | ० | ० | ७७ | ० | ० | ८५ | ० | ० |
| ग्रंथविक्री | ५००० | ० | ० | ५८३८ | ३ | ११ | ३००० | ० | ० |
| परीक्षा शुल्क | १५००० | ० | ० | ११७५२ | २ | ० | १२५०० | ० | ० |
| म. प. सा. देणगी | ३०० | ० | ० | ३१० | ० | ० | ३०० | ० | ० |
| इतर व व्याज | २०० | ० | ० | १६४ | ४ | ० | २०० | ० | ० |
| संमेलन | २०० | ० | ० | ४८९ | | ० | २०० | ० | ० |
| पुणें म्युनि. कार्पो. देणगी | | | | २०० | ० | ० | | | |
| | | | | २२४३८ | ३ | ११ | | | |
| एकूण खर्च | | | | | | | १९,६८५ | ० | ० |

अर्थसंकल्प

## खर्च

| खातें | अंदाज १९५५–५६ | | | प्रत्यक्ष खर्च १९५५–५६ | | | अंदाज १९५६–५७ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | रु. | आ. | पै | रु. | आ. | पै | रु. | आ. | पै |
| पगार | ३,८०० | ० | ० | ३,६७९ | ० | ० | ३,८०० | ० | ० |
| प्रॉ. फंड | ११६ | ४ | ० | ११६ | १ | ० | १२३ | ० | ० |
| वीज | ११० | ० | ० | ८१ | ४ | ९ | १०० | ० | ० |
| भुईभाडें | १५ | ० | ० | १५ | ० | ० | १५ | ० | ० |
| म्युनि. कार्पो. कर | ९८ | ० | ० | ९८ | ० | ० | ९८ | ० | ० |
| कार्यालय छपाई | ३०० | ० | ० | २५६ | ० | ३ | ३०० | ० | ० |
| कार्यालय टपाल | २५० | ० | ० | २०६ | ११ | ३ | २५० | ० | ० |
| सादील | १०० | ० | ० | +१०४ | ६ | ० | १०० | ० | ० |
| आतिथ्य | २०० | ० | ० | १९६ | १३ | ० | २०० | ० | ० |
| उपसमिति | ५० | ० | ० | ३७ | १२ | ० | ५० | ० | ० |
| किरकोळ | ३०० | ० | ० | २१९ | १४ | ० | ३०० | ० | ० |
| कार्यकारी–नियामक | १,००० | ० | ० | ५७३ | ६ | ६ | ६०० | ० | ० |
| पत्रिका छपाई-टपाल | ३,००० | ० | ० | +३,०७५ | ० | ६ | ३,००० | ० | ० |
| इमारत दुरुस्ती | ५०० | ० | ० | +५१५ | १० | ० | १०० | ० | ० |
| नवीन सामान | ५०० | ० | ० | ३४८ | ६ | ० | ५०० | ० | ० |
| निवडणूक | २०० | ० | ० | ० | ० | ० | २०० | ० | ० |
| परीक्षा | ९,००० | ० | ० | ६,७६४ | ७ | ९ | ८,००० | ० | ० |
| शाखासभा | ३०० | ० | ० | २०७ | १५ | ४ | २५० | ० | ० |
| प्रकाशन | ५,५०० | ० | ० | ५,३१० | ० | ६ | १०० | ० | ० |
| प्रवासप्रचार | ५०० | ० | ० | +५१९ | १० | ० | ८०० | ० | ० |
| ग्रंथसंग्रहालय | ० | ० | ० | ४१७ | ११ | ९ | ० | ० | ० |
| घसारा | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० |
| संशोधन: समिति | ० | ० | ० | ० | ० | ० | ५०० | ० | ० |
| एकूण खर्च | | | | | | | १९,६८२ | ८ | ० |

टीप:—संदर्भग्रंथसंग्रहाल्यांत पुस्तकें व सामान विकत घेण्यासाठी ताळेबंदांत निर्दिष्ट केलेल्या ग्रंथालयनिधींतून रु. ५०० ची रक्कम स्वतंत्र मजूर करावयाची आहे.

अध्यापक विद्यालयांनी पाठविलेल्या शब्दांच्या याद्या, शेतकरी, लोकशिक्षण अशा तऱ्हेच्या ग्रामीण विभागांशीं संबंधित असलेलीं नियतकालिकें, मराठींतील ग्रामीण जीवनावर लिहिलेल्या कादंबऱ्या, लघुकथा, लोककथा इत्यादि वाङ्मय, ग्रामसुधारणेसाठीं सरकारने तयार केलेलीं पत्रकें व पुस्तिका इत्यादि विविध साधनांचा उपयोग करून प्रथम ४०००० शब्दचिठ्या तयार केल्या. त्यांतून सुमारें १२००० शब्द सिद्ध झाले. आवर्तनाप्रमाणे ( Frequency ) हे शब्द लावण्यांत आले, व ज्यांचीं आवर्तनें पांच किंवा अधिक आहेत असे १९५० शब्द प्रस्तुत कोशासाठी निश्चित करण्यांत आले. हें कार्य परिषदेचे चिटणीस प्रा. वा. दा. गोखले यांनी मोठ्या तत्परतेने व जबाबदारीने केलें व अवधि थोडा असूनहि कोशाचें हस्त-लिखित मूळ संकल्पानुसार शिक्षणखात्याच्या स्वाधीन करण्यांत आलें. प्रस्तुत संग्रह शक्य तितका निर्दोष करण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. पहिला प्रयत्न म्हणून हा संग्रह निश्चित उपयुक्त ठरेल अशी आम्हांला आशा वाटते.

**संशोधन–समिति–कार्य**–१९५६-५७ या वर्षीं समितीतर्फे एखादें जुनें हस्तलिखित संपादन करणें किंवा महाराष्ट्रांतील अनेक धर्मसंप्रदायांपैकी नाथसंप्रदाय, दत्तसंप्रदाय इत्यादि-कांच्या बाबतींत संशोधनकार्य हातीं घेण्याचें ठरलें आहे. या कामीं डेक्कन कॉलेजचे डॉ. सु. मं. कत्रे व डॉ. ए. द. कुलकर्णी यांचें मार्गदर्शन लाभणार आहे.

**शुद्धलेखन–समिति**–म. सा. परिषदेने नियुक्त केलेल्या शुद्धलेखन-समितीच्या नवीन सूचनांचा अहवाल तयार झाला असून तो कार्यकारी मंडळापुढे विचारार्थ ठेवण्यांत आला आहे.

परिषदेच्या कार्यांत अनेक लोकांचें अनेक तऱ्हेने साहाय्य होत असतें त्या सर्वांचे आभार.

---

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्

## नियामक मंडळाची सभा

पुणें, दि. १८-५-१९५६

स. न.

परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. २४ जून १९५६ या दिवशीं सायंकाळीं ४ वाजतां पुणें येथे मा. प. साहित्य मंदिरांत भरणार आहे. सभेला आपण यावें ही विनंती.

कामें:—

१ दुखवटा ठराव.

२ मागील सभेचें इतिवृत्त वाचून संमत करणें.

३ १९५५।५६ चे कार्यकारी मंडळाने सादर केलेलें इतिवृत्त व जमाखर्च यांना संमति.

४ १९५६।५७ च्या कार्यकारी मंडळाने संमत केलेल्या अंदाजपत्रकास संमति

५ ठराव. पंढरपूर येथें दि. ३१।१०।५५ रोजीं भरलेल्या विशेष साधारण सभेच्या आदेशाप्रमाणें संमेलन अध्यक्ष निवडणूक विषयक पुढील सूचनांचा विचार.

अ संमेलनाचा अध्यक्ष म. सा. परिषदेच्या सभासदांनीच निवडावा व तें एकच नांव स्वागतमंडळाकडे पाठवावें.

ब म. सा. प. चे सभासद व स्वागत मंडळाचे विशिष्ट अवधीपर्यंत झालेले सभासद कीं, जे त्याचवेळीं म. सा. परिषदेचेहि सभासद झाले आहेत अशा सर्वांनी मिळून अध्यक्ष निवडावा. मात्र पूर्ण अधिकार मिळण्यासाठी सभासदांच्या बाबतींत ठेवलेला एक वर्षाचा अवधि या विशिष्ट कार्यासाठीं झालेल्या स्वागत मंडळाच्या सभासदांना लागू करूं नये.

क वरील प्रमाणेंच परंतु स्वागत मंडळांतील विशिष्ट संख्येपर्यंत उदा. २५ इतके सभासद घेऊन अध्यक्षीय निवडणूक करावी. स्वागत मंडळाचे हे सभासद म. सा. प. चे सभासद असलेच पाहिजेत असें नाहीं.

ड परिषदेचा अध्यक्ष स्वतंत्र असावा व संमेलनाचा स्वतंत्र असावा. मात्र संमेलनाचा अध्यक्ष हा पुढील संमेलन होईपर्यंत परिषदेच्या कार्यकारी मंडळाचा पदसिद्ध सभासद असावा.

ध. नि. १२ साठी या सर्व सूचना आहेत.

६ पत्रव्यवहार.

७ हिशेब तपासनिसांची नेमणूक.

८ अध्यक्षांच्या अनुमतीने आयत्या वेळचीं येणारीं कामें.

वा. दा. गोखले
अ. गं. मंगरूळकर
बा. रं. सुंठणकर
चिटणीस

शं. दा. पेंडसे
अध्यक्ष
चिं. वि. जोशी
कार्याध्यक्ष

# आपल्या वाचनालयासाठी

## ललित वाङ्मय

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मीठ-भाकर | ( काव्य ) | -- | ग. ल. ठोकळ | २–८–० |
| सुगी | ( ,, ) | -- | ,, | ३–०–० |
| गावगुंड | ( कादंबरी ) | -- | ,, | २–०–० |
| कडू साखर | ( कथा ) | -- | ,, | ३–०–० |
| सुगंध | ( ,, ) | -- | ,, | ३–०–० |
| पहिले चुंबन | ( ,, ) | — | ,, | ३–०–० |
| मोत्यांचा चारा | ( ,, ) | — | ,, | २–४–० |
| अंजनी | ( कादंबरी ) | — | के. नारखेडे | ४–०–० |
| सराई | ( ,, ) | — | र. वा. दिघे | ५–०–० |
| जगन्नाथ पंडित | ( ,, ) | — | गो. नी. दांडेकर | २–८–० |
| आजकालचे विद्यार्थी | ( प्रबंध ) | -- | श्री. म. माटे | २–८–० |
| साहित्यधारा | ( ,, ) | -- | ,, | २–८–० |
| प्रौढांचें शिक्षण व साक्षरताप्रचार | ( प्रबंध ) | | आ. अ. मानकर | १–८–० |
| साहित्यदर्शन | ( आधुनिक वाङ्मयप्रकार ) | — | सरोजिनी वाबर व वि. म. कुलकर्णी | ४–०–० |

## चरित्र–वाङ्मय

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आजच्या गोष्टी, | भा. १ | — | के. नारखेडे | १–०–० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १–०–० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | १–०–० |
| जगाचे प्रवासी, | भा. १ | — | श्री. म. माटे | १–४–० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १–४–० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | १–४–० |
| मानवतेचे पुजारी, | भा. १ | — | ना. ध. पाटील | १–८–० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १–८–० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | २–०–० |
| ,, ,, | भा. ४ | — | ,, | २–०–० |
| वीर विनायक | | — | वा. गो. देशपांडे | २–०–० |
| महात्मा फुले | | — | ए. के. घोरपडे | १–१२–० |
| कर्मवीर भाऊराव पाटील | | — | ,, | २–४–० |
| अहल्याबाई होळकर | | — | वा. दा. गोखले | ०–१२–० |
| बारा शास्त्रज्ञ | | — | श्री. म. माटे | ३–८–० |
| महर्षि आइन्स्टीन | | — | अमरेंद्र | ०–८–० |
| सेनापति तात्या टोपे | | — | डॉ. ना. दा. सावरकर | १–८–० |

**लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २.**

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अरविन्द मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक-रस्ता पुणें २.

